# सूचना

या नाटकाचा प्रयोग करूं इच्छिणाऱ्यांना प्रयोग करण्याची परवानगी दिली जाईल.

या कामीं त्यांनीं लेखकाशीं पत्रव्यवहार करावा किंवा समक्ष भेटावें. लेखकाच्या लेखी परवानगीवांचून प्रयोग केल्यास कायदेशीर इलाज केला जाईल.



मुद्रक–मनोहर पाटील, जय गुजरात प्रिंटिंग प्रेस, गांवदेवी, मुंबई ७
प्रकाशक–वि. र. बाम, रामकृष्ण बुक डेपो, गिरगांव, मुंबई ४

माझी प्रिय पत्नि

**सौ. वसुंधरा**

हिला

प्रीतिपूर्वक अर्पण

—लेखक

# श्री. ला. कृ. आयरे
# यांची नाट्यसेवा

## प्रकाशित

फिर्याद
लाख माणूस
जुलूम
बुद्धिभेद
मायेचा संसार
शेतकरी दादा
मंगल दिव्य

## आगामी

स्वराज्य-रवि
( ऐतिहासिक शिवकालीन नाटक )

# या नाटकासंबंधीं थोडेसें

या नाटकासंबंधी थोडेसें सांगावयाचें म्हणजे हें नाटक बहुजनसमाजांतील ग्रामीण जीवनांत वावरणाऱ्या दोन तरुण जीवांची प्रेम कहाणी आहे. ही 'प्रेम कहाणी' रंगवितांना उत्तान शृंगाराला मुळीच थारा दिलेला नाहीं किंवा सनातन रीतिरिवाज पाळून प्रेम प्रकरणीं मौनत्वहि पाळलेलें नाहीं. दोन भाबडे जीव (स्त्री-पुरुष) एकमेकांवर जडलेल्या निस्सीम प्रेमासाठीं जातीची उच्चनीच पातळी न पहाता एकमेकांवर जीव जडवतात आणि आपलें जीवन एकजीव करूं पहातात. त्याच्या या मार्गांत आलेल्या अडचणी आणि पुन्हां त्या अडचणींचें निवारण शक्य त्या आकर्षक पद्धतीनें मांडून मी या नाटकाचा शेवट गोड केलेला आहे.

जातीय भावनेला, पोकळ अहंकाराला, आणि अमानुषपणाला कायमचे चिकटून राहून खरा माणूसकीधर्म विसरूं पहाणाऱ्या, स्वतःला प्रतिष्ठित 'खानदानी' गृहस्थ समजणाऱ्या 'मराठ्या'चा 'बुद्धिभेद' या नाटकांत मी करून दाखविलेला आहे. सोबत उपकथानक एका खेडवळ अस्पृश्य माणसाच्या जीवनाचें असून, शक्य तों तें 'वास्तव' दाखविण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. या माझ्या प्रयत्नाच्या यशप्राप्तीसाठी नाट्यरसिकांनी मजवर कृपादृष्टि ठेवावी हीच नम्र विनंती.

या पुस्तकाचे प्रकाशन कार्य सर्वस्वी शिरावर घेऊन, मोठ्या हौसेनें, पुस्तक आकर्षक पद्धतीनें वाचकांना सादर केल्याबद्दल रामकृष्ण बुक डेपो (मुंबई ४) चे संचालक माझे मित्र श्री. वि. र. बाम यांचा मी अत्यंत आभारी आहे. तसेंच पुस्तकांत छायाचित्रे देणारा नटवर्ग आणि प्रभात स्टुडिओचे मालक माझे मित्र श्री. दादासाहेब मिठबावकर आणि चित्रकार श्री. अण्णा साळवी, त्याचप्रमाणें या कार्यांत ज्यांनीं ज्यांनीं हातभार लावला असेल त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून लेखणीला विराम देतों.

पहिला मजला, इराणी चाळ 'ए',
८७ चिंचपोकळी रोड,
मुंबई २७

सर्वांचा कृपाभिलाषी,

**ला. कृ. आयरे**

स्वस्तिक नाट्यमंदिरातर्फे होणाऱ्या
या नाटकाच्या प्रयोगांत भूमिका करणाऱ्या
व्यक्तींचा परिचय

| | |
|---|---|
| **हणमंतराव** | श्री. ला. कृ. आयरे |
| **संभाजी** | ,, शंतनुकुमार राणे |
| **बाजीराव** | मा. सुरेश पाटील |
| **साबाजीराव** | ,, मधुसूदन आंगणे |
| **जानोबा** | श्री. माधवराव चव्हाण |
| **सुशीला** | कु. दुर्गा नागेशकर |
| **सोनी** | ,, निरा सावंत |
| **यमुना** | विजया सावंत |

# बुद्धि-भेद

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

[ स्थळ :—एका खेडेगांवांतील सुखवस्तु गृहस्थ हणमंतराव यांच्या घराचा ओटा. कांहीं गांवकरी मंडळीबरोबर हणमंतराव गप्पा मारीत बसलेले आहेत. ]

**हणमंतराव** :—ऐकलंत मंडळी, आमच्या वाडवडिलांनीं जे पराक्रम केले, ते साऱ्या दुनियेंत कोणी केले नसतील. खरं कीं नाहीं साबाजीराव ? त्यांच्या त्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकल्या कीं, अजूनसुद्धां अंगात स्फूरण येतं. वाटतं धरावी तलवार आणि उतरावं समरांत.

**साबाजीराव** :—समरांत उतरण्याऐवजीं हल्लीं आम्हीं रानांतच उतरतों आहोंत ! ( सर्व मंडळी हसतात )

**हणमंतराव** :—सारा महाराष्ट्र गाजवला आमच्या पूर्वजानीं. महाराष्ट्राच्या मराठ्याच्या नजरेला नजर भिडवण्याची कुणाची छाती होती ?

**साबाजीराव** :—हणमंतराव, इतिहासजमा झाल्या आतां त्या सर्व गोष्टी. काप गेले आणि आतां नुसती भोकं शिल्लक राहीलीं आहेत !

**हणमंतराव** :—आजोबा सांगायचे आमचे. म्हणे आमचे पंजोबा कालपर्यंत घोड्याशिवाय घराबाहेर पाऊल टाकीत नसत. काय ताकद होती म्हणतात त्यांना. अहो, भीमाचा दुसरा अवतार ! हो ! एक गम्मत सांगतात त्यांची ! ते एकदां गेले होते शिकारीला. सबंध रान काढून झालं तरी सावज कांहीं उठेना ! शेवटीं उठला एक ससा ! त्या सशावर त्यानीं तीन गोळ्या झाडल्या पण त्याला कांहीं एकसुद्धां लागली नाहीं ! ( सर्व मंडळी हसतात. ) पुढं ऐका ! पुढं ऐका ! तेव्हां त्यानां जो राग आला त्याबरोबर त्यानीं उडी टाकली घोड्यावरन खाली ! आणि ज्या बेटांत ससा लपून बसला होता त्या बेटावर एकदम झडप घातली ! आणि मग काय विचारतां राव ! अशी त्या

सशाची मान मुरगाळली म्हणता त्यानी-तो ससा चीं-चीं-चीं करून ओरडला, धडपडला, काय काय काय नाना तऱ्हा करूं लागला ! छे ! सशाचीच धडपड ती ! आणि हे आमचे पंजोबा म्हणजे काय सामान्य ताकदीचे माणूस काय ! अहो चार हत्तींच बळ त्यांना ! ते सोडणार काय त्या सशाला ? खूप धडपड झाली म्हणतात ! शेवटीं तो ससा त्यांच्या हातांतून निसटला ! ( सर्व मंडळी हसतात ) पण लगेच त्यानीं धांव मारली आणि ससे-होलपट करून पकडला पुन्हा त्या सशाला आणि असा उचलून आपटला म्हणतां राव, अगदीं पहिल्याच फटक्यांत तो ससा ठार ! असे ते पराक्रमी वीर कुठं आणि आम्हीं कुठं ! काय साबाजीराव ?

**साबाजीराव :**—अहो जुनी माणसं ती ! त्यांना वेळेला दोन शेर लागत असत. आणि आम्हांला दोन दिवसांत दोन शेर खपत नाहींत. आतां ह्या अजटंचाई मुळं भूक मेली तें वेगळं !

**हणमंत :**—पूर्वीच्या गोष्टी ऐकल्या नि आतांच्या पाहिल्या म्हणजे मस्तक भडकून जातं ! ( जानू महार येतो. )

**जानू :**—जुवार साहेब !

**हणमंत :**—रामराम. काय आहे रे ?

**जानू :**—आज संमद्या गांवास वर्दी देयास सांगतलानी हाय पाटलांनी.

**हणमंत :**—कशाबद्दल रे ? काय आहे काय ?

**जानू :**—आपलं सरकारी अमलदार येनार हायत नव्हं त्या वडाच्या माळावर.

**साबाजी :**—हो, सकाळीं बाजीराव सांगत होता खरा. सरकारचे कोणी अमलदार कर्जे महलांत येणार आहेत म्हणून. आणि तिथून लगेच ते आमच्या गांवाला धावती भेट देणार आहेत.

**हणमंत :**—नुसत्या भेटी देऊं नका म्हणावं ! काय करायचं असेल ते लौकर करून दाखवा. स्वराज्याचं सुख भोगूं दे एकदां लोकांना !

**जानू :**—जुवार सायब. येतो तर मी. ( जानू जाऊं लागतो, इतक्यांत हणमंतरावांची बहिण सुशीला घरांतून बाहेर येते व दरवाजांतून जानूला हांक मारते व पुढें जाऊन घरातून आणलेली भाकर त्याला देते. )

**सुशीला :**—जानुबाबा, अहो, जानुबाबा धरा, थोडीशी भाकर आहे. ( सुशीलेनं दिलेली भाकर जानू पदराला बांधून घेऊन जातो. )

**हणमंत** :—पाहिलंत साबाजीराव, पहा ही आमची सुशीला अतिशय दयाळू बुवा ! स्वतः उपाशी राहील पण आल्या गेल्याची उठाठेव बरोबर राखील.

**सुशीला** :—( पुन्हां बाहेर येऊन ) अण्णा, आंघोळीला पाणी काढलं आहे.

**हणमंत** :—अरे हो ! आंघोळ करायची अजून बाकी आहे नाहीं का ? ( साबाजीरावासह सर्व मंडळी उठून जाण्याच्या तयारींत— )

**साबाजी** :—बराय् ! हणमंतराव चलतों आम्हीं आतां.

**हणमंत** :—आंघोळ करून जा आतां.

**साबाजी** :—ठीक आहे. हें घर का दुसऱ्याचं आहे ? बराय् येतों आम्हीं. ( जातात )

**हणमंत** :—सुशे, तुझ्या एक दिवस चांगला सपाटा मारीन हं मी ? अशी पहातेस काय तोंडाकडं ? असं महारापोराला जर तूं सांजसकाळ अन्न देऊं लागलीस तर घरांत शिल्लक रहाणार काय ?

**सुशीला** :—अण्णा, सकाळच्या प्रहरीं आपल्या घरीं आलेल्या उदम्याला असंच दुर्मुखलेलं पाठवूं नये !

**हणमंत** :—त्या बाबतींत तूं मोठीच आजीबाई ग ! कुठून शिकून आलीस हें सगळं कोण जाणे. तरीच आमची आई सांगत असे; बाबारे, या मूर्तीला मात्र चांगली सांभाळ, नाहींतर दानधर्म करतां करतां एक दिवस दिवाळं काढील तुझं.

**सुशीला** :—तर तर ! अशी काय मी अगदींच दिवाळखोर आहे होय अण्णा ? देवाच्या दयेनं आपल्या घरीं पुष्कळ आहे. दारावर आलं त्याच्या पदरांत तुकडाभर टाकावं असं आपली आई सांगत नसे का ? बाबा तर वेळेवर आलेल्याला आपल्या पुढ्यांतलं ताट सुद्धां देत असत. अण्णा आणि तुम्हीं काय कमी देतां लोकाना ? हा ओळखीचा आला दे त्याला फणस. तो ओळखीचा आला द्या त्याला दहा आंबे. एवढी कलमं जर दुसऱ्याचीं असतीं तर तो श्रीमंत झाला असता त्यांच्या उत्पन्नावर. झाडावर एक काजू रहात नाहीं. नेहमीं पाचपन्नास केळींची झाडं असतात परसांत, पण घरांतल्या माणसांना एका केळ्याची सालसुद्धां दृष्टीस पडत नाहीं. हा फौजदार आला दे एक फणा काढून. तो मामलेदार आला दे एक घड तोडून. वांग्याच्या ढाकांना आणि मुळ्याच्या भाजीला पाणी लावतां लावतां रहाट ओढून ओढून आमची कंबर मोडून जाते, पण आम्ही भाजी खाण्यापूर्वींच लोकांना वाटून संपते सगळी. एक कीं दोन अशा हजारों गोष्टी सांगूं तरी किती !

**हणमंत** :—आतां आणखी सांगायचं काय बाकी ठेवलं आहेस? आमच्या तंगड्या आमच्याच गळ्यांत गेल्या म्हणायच्या! बरं बुवा! आमचं आपलं राहीलं. मी आतां आंघोळीलाच जातों. नाहींतर पुन्हां रागवायचीस तूं.

[ हणमंतराव आंत गेल्यावर सुशीला ओट्यावर एकटीच असते. यावेळीं तिला संभाजीची आठवण येते व त्याला उद्देशून ती गाणं म्हणत असते. जवळच आड-उभा राहून बाजीराव तिचं गाणं ऐकत असतो. गाणं संपताक्षणींच तो प्रगट होतो व तिची थट्टा करण्याच्या उद्देशानें बोलतो. ]

**सुशीला** :—

कां प्रियकरा दावितां लीला!
धरिला हा अनुराग कशाला?
अगिदींच मी हो भोळी बाला!
लाविता किती ओढ जीवाला!
स्नेह सख्या हा दृढ झाला!
वदते स्मरूनी तव चरणाला!

**बाजीराव** :—( प्रवेशून ) ऐकलं बरं?

**सुशीला** :—काय?

**बाजीराव** :—काय? गाणं. आणि तें कुणाला उद्देशून म्हणत होतीस तें सुद्धां समजलं बरं?

**सुशीला** :—भाऊ हें काय रे? बघ हं तूं—

**बाजीराव** :—अग, हो हो हो! अशी शिंगं काय झाडतेस मारकोल्या पाडीसारखी! मला सगळं माहीत आहे.

**सुशीला** :—काय माहीत आहे? सांग, काय माहीत आहे?

**बाजीराव** :—काहीं नाहीं. कांहीं नाहीं—

**सुशीला** :—सांग ना? आतां सांग ना? आतां कां सांगत नाहींस? आतां कसा भ्यालास?

**बाजीराव** :—अग जा. मी भितोय तुला. पण बोला कशाला! आपण आपलं गुपगूप राहिलेलं बरं. लढाई कुठपर्यंत जातेय ती पाहूं या. आलाच हात-घाईवर प्रसंग तर मग होईन पुढं. बरं तें जाऊं द्या! आज सभा आहे वडाच्या

माळावर. बडेबडे अमलदार नि पुढारी येणार आहेत आज. तेव्हां मला तिकडं लौकर गेलं पाहिजे. आमच्या गांवची सर्व गाऱ्हाणीं त्यांच्या कानांवर घातलीं पाहिजेत. पंधराशें लोकवस्तीचा आमचा गांव किती मागासलेला आहे हें त्यांच्या नजरेला आणून दिलं पाहिजे. सक्तिचं शिक्षण झालं आहे तरी त्याचं महत्व या गांवढळ लोकांना अजून कळत नाहीं. गावांत सोईस्कर असें शाळागृह नाहीं. शिक्षण घेणाऱ्या मुलांना हव्या त्या सोई नाहींत. पोष्ट जवळपास नाहीं. वैद्यकीय मदतीसाठीं तर पांच मैल दूर जावं लागतं. एक ना दोन कितीतरी गाऱ्हाणीं आहेत, कितीतरी तक्रारी आहेत त्या आज त्यांच्या पुढं मांडल्याच पाहिजेत.

**सुशीला** :—खरंच भारतांतील इतर प्रांताच्या मानानं आपल्या भागांतील खेडीं म्हणजे अगदींच खेडवळ आहेत अजून.

**बाजीराव** :—त्याला कारण आहे, ते स्वार्थी आहेत. स्वतःचा बडेजाव राखण्यासाठीं इतरांना ते हीन लेखतात आणि त्यांना गुलामगिरींत राबवून स्वतःचा स्वार्थ पूरेपूर साधून घेतात. गरीब अडाणी लोकांची दिशाभूल करून स्वतःची मात्र प्रतिष्ठा वाढवून घेतात ! आपण मोठे वतनदार, मोठे विद्वान, खानदानी घराण्यातले बडे पुढारी म्हणून मिरवतात, आणि गरीब अडाणी जनतेच्या सुखदुःखाची होळी पेटवतात ! बिचारे गरीब लोक शेणांतल्या किड्या-प्रमाणें शेणांतच वळवळत राहण्यापलिकडे दुसरं काय करणार ! कोणी तरी या नरकवासातून बाहेर काढील म्हणून डोकें वर करून पहावें तर गांवगुंडाच्या लाथेच्या ठोकरींत चेंगरून त्याचा चेंदामेंदा होतो ! सुशीला, आतां संपूर्ण स्वराज्यांतल्या लोकांना असं अज्ञानांत ठेऊन कसं चालेल !

**सुशीला** :—खरंच, जगाच्या मानानं पाहिलं तर आमच्या हिंदुस्थानांत अशिक्षित लोक फार नाहीं ?

**बाजीराव** :—तरी गेल्या कांहीं वर्षात सरकारनं साक्षरता प्रसार करून लाखो लोक साक्षर केले. आतां तुझीच गोष्ट घे. तुला ह्या विविध विषयांची किती गोडी वाटते पहा. कारण चार पुस्तकं कां होईना पण तूं शिकली आहेस. त्या वेळीं इत्तर मुलीप्रमाणें बाबानीं जर तुला अडाणी राहूं दिलीं असती, तर तूं सुद्धां या गावांतील इतर चार साळकायामाळकाया सारखीच लोकांची निंदा नालस्ती करीत शेजार घरीं खेकट्या पिटीत राहीली असतीस. सांगायचं तात्पर्य काय कीं, हा परिणाम शिक्षणाचा. तेव्हां आजच्या सभेला फार रंग येणार आहे.

आहून साऱ्या गांवकऱ्यांना जमा करून घेऊन या. मी पुरुषाची बाजू सांभाळतो तूं स्त्रियांची सांभाळ.

**सुशीला** :—पण अण्णा मला सभेला येऊं देतील का? ते म्हणतात बायकानी सभेला जाऊं नये.

**बाजीराव** :—अग अण्णा काय, अगदींच जून्या मताचे. आतां जगाकडे डोळेझांक करून कसं चालेल म्हणावं ?

**सुशीला** :—पण त्यांच्या पुढं बोलायचं कुणी बाई, बरे तर बरे नाहींतर जमदाग्नी.

**बाजीराव** :—हें पहा, मी तुला एक युक्ति सांगतो. तूं आतां घरांत जा. इकडं तिकडं वावरल्या सारखं कर, आणि झटकन मागल्या दारानं पसार हो अण्णा रागावले तर पुढचं पुढं पाहूं ! चल जा पळ लौकर. मी तोपर्यंत वाडीवर जाऊन मंडळींना जमावतो.

( सुशीला घरांत जाते. बाजीराव बाहेर जातो. )

[ पडदा ]

★

## प्रवेश २ रा

[ स्थळ :—गांवाबाहेरील शेत. संभाजी कुऱ्हाड खांद्यावर घेऊन शेतांत काम करायला आलेला असतो. दुसऱ्या बाजूनें जानू घाईघाईनें येत असतो. त्याचा पाय घसरून तो खाली पडतो. संभाजी धांवत जाऊन त्याला उठवतो. ]

**संभाजी** :—अ र र्रे र्रे ! उठा उठा जानोबा. ( उठवतो ) अहो पडलांत कसें ? काय धडपड ही तुमची ! आँ ! या उनातनं उगीच धडपडीनं धावतां कशाला ? बसा, बसा, जरा दम घ्या. मग बरं वाटेल. पाणी आणून देऊं का ?

**जानू** :—( कण्हत बोलतो ) नको. संभाजी दादा, तुमी शिवलाव माज ? उगीच हा एक आंघोळी करायचा तरास झाला तुमास !

**संभाजी** :—छे हो ! आंघोंळ हो कशाला ? आतां तें जूनं शास्त्र गेलं. आपण आतां त्या जून्या रूढी मानायला तयार नाहीं. तुम्हाला माहीत आहेना जानोबा, अस्पृश्यतेचं आतां पूर्ण उच्चाटन केलं आहे आपल्या सरकारनं.

**जानू** :—म्हायत हाय दादा ! पन समाजनाराची कामं हायत ती ! आपून गरीब म्हार तुमच्या पायाचे चाकूर ! ल्हान तोंडी मोठा घास घेतला तर तो अडस व्हयल ना ?

**संभाजी** :—या उनाच्या कडाक्यातनं जरा स्वस्थ बसायचं घरीं, ते तुम्ही चाललांत कुठं ?

**जानू** :—आइून साऱ्या म्हारमंडळीला त्या पयलीकडच्या वाटन सबस पाटवली. नि मी ह्या बाजून जायास निघालो त हे तुम्ही भेटलाव. आज सांज चवल्या पारी सबा हाय नां वडच्या माळावर.

**संभाजी** :—अरे हो ! या कामा पुढं आठवण सुद्धां रहात नाहीं जानोबा ! दादा गेले असतीलच म्हणा ! तरी पण मला सुद्धां आलंच पाहिजे सभेला.

**जानू** :—आयकलंव संभाजीदादा, या सारवजनीक कामाची माज लय हौस. ह्या कामासाटी मी अगदीं मेलेला जीता व्हयन, पर मागं हटायचा नाय.

**संभाजी** :—तें आतां दिसलंच मला. जानोबा, आज मात्र तुम्हीं इथं या उनांत अगदीं पूरे धडपडला असतांत. काय धाड्दिशीं आपटलांत हो ! बराच मार लागला नाहीं ढोपराला ? आताशां तुमची प्रकृतिहि बरी नसते. किती दमलांत पहा तुम्हीं.

**जानू** :—अवो दादा आतां वय झालं आमचं ! त्यांतनं तुकडा मिळायची मारामार ! कसा धड ऱ्हायला हा जीव ! तुमच्या सारकं आमी आतां तरनंबांड हावत व्हय ? ह्या असल्या उनातनं आतां असं ह्यां तातडींचं काम नाय झेपत.

**संभाजी** :—जानोबा, आतां तुम्हीं फार हैराण झालां असतांना, तर काय केलं असतं ठाऊक आहे ? अहो, मारले असते तुम्हांला पाटुंगळीला आणि 'भल्लोरी' करीत घेऊन गेलो असतों तुम्हांला गावांत. ( जानू हसतो ) काहो ? अगदीं जोरजोरानं हांसतासे ?

**जानू** :—संभाजी दादा, तुमच्या ह्या भल्लोरीवरनं आटवान झाली. अवो ही भल्लोरी घालतात सापाडांत ( हसतो ) त्या-त्या-त्या-पयलिकडच्या. शिर्क्याच्या भरडांत व्हता म्हनतात एकदां सापाड. काय गम्मत सांगू तुम्हास ! ताड् ताड् ताड् ताड् ताड् ! ढुंम ढुम ढुम ढुंम ! ढुढुंम ढुढुंम ढुमं ढुंम ढुंम ढुंम ! ढुंम ढुंम ढोलक्यावर थाप, ताशावर काटी, थाळीवर ठोका बसायला नि भल्लोरीचा गजर झाल्याबराबर पंचान्नव वर्सांचा तुमचा म्हातारा आजा

हातरूनातनं ताड्कन वर उठला नि कंबार बांदून ताट झाला. अवो, खळ्याची पेळू वलांडायस ज्यास ताकद नाय, तो मानूस म्हणतात अंगांत वारं संचारल्यागत धडपडत धडपडत त्या सापाडाच्या भरडाते घाटी डोंगर तुडवून एक कोस चालून गेला.

**संभाजी**:—काय सांगता काय हें तुम्हीं जानोबा खरं हे?

**जानू**:—अवो, खरं वाटायचं नाय कोनाला. पन खूद आमचा म्हातारा सांगे हो ही हकिगत? आनि म्हणतात तितं गेल्यावर त्या म्हाताऱ्यानं जी भोय धरलांत जमिनीत ती काय इचारू नका. तुमच्या सारक्या पांच पन्नास जवान पोरांनीं इचकून किचकून जीव धावला पर म्हाताऱ्याचं ढोंपार हाललं नाय जाग्यावरनं. अकेरीला साऱ्या गावानं म्हाताऱ्याला भल्लोरी करीत आनलान घरास! सापाडास जमलेल्या आजूबाजूच्या गांवची मंडळी तोडांत बोटं घालून परत गेली, पर म्हाताऱ्याचं ढोपार रेटायास कुनास ताकद नाय झाली!

**संभाजी**:— अहो जूनी माणसं ती! त्यांच्या आंगात ताकद होतीच तशी.

**जानू**:—अवो ताकत काय रेड्याच्या आंगात सुद्धा हाय पर इरयनि इगुत हवी नां?

**संभाजी**:—बरं पण तुमचं ढोपर आतां झालं का चांगलं?

**जानू**:—दुकतंय वयच वयच. व्हयल बेस! बराच वकत झाल. मी चलतो पुढं आस्ती आस्ती. वाडावडलांच्या जुन्या आटवनी. ह्या दादा! तुम्हां-सारख्यांच्या उपेगी पडतील पुढं! बरं जातो आदी!

[ जानोबा लंगडत लंगडत जातो. दुसऱ्या बाजूनें सुशीला येत असते. तिला पाहून संभाजी आडोशाला लपून रहातो. सुशीला त्याच्या अंगावरून पुढं सरक-ताच तो मागाहून शूत शूत करून तिला थांबवतो. ]

**संभाजी** :—शूत-शूत! अहो, जाणार?

( सुशीला त्याला पाहून लाजते. व लटकेंच आवसान धरून बोलतेः )

**सुशीला** :—काय हो शूतशूत करणार? रस्त्यानं चाललेल्या एकट्या दुकट्या बाईला असे शूSSSत! शूSSSत! काय करतां?

**संभाजी** :—मग काय करणार! भूतासारखा आवाज काढला तरी तूं घाबरणार नाहींस. वाघासारखा गुरगुरलों तरी तूं भीक घालणार नाहींस. समंधा-

सारखा कुंकारा फोडला तरीहि तूं नुसतं मागे वळून सुद्धां पहाणार नाहीं. तेव्हां म्हटलं काल्पनिक दाटूमाटूचा भूताखेतांचा आणि वाघभाऊचा खेळ खेळत न बसतां आपलं खरोखरीचं शूऽऽऽत शूत करावं !

**सुशीला** :—वाघभाऊच्या गुरगुरण्याला आणि भूताखेतांच्या आरोळ्यांना घाबरणारी मी नव्हे. माहित आहे ना ? वाघाची मावशी आणि समंधाची आजी आहे मी ?

**संभाजी** :—अरे बापरे ! मग दूरून बोल तूं. अशी जवळ येऊं नकोस. सर मार्ग. चांगलं पांच सहा हातांचं अंतर असूं दे मधें. कारण वाघाची उडी जर बारा हात आहे तर, त्याच्या मावशीची निम्मी म्हणजे सहा हात तरी असेलच. वाघाची मावशी म्हणजे मांजर, आणि समंधाची आजि म्हणजे—म्हणजे—

**सुशीला** :—तुमची मावशी. राहूंदेत तुमच्या चिंऊं म्यांऊच्या गोष्टी. सभा आहे आज वडाच्या माळावर. चला लौकर.

**संभाजी** :—जाऊं या ग, सभेला अजून चांगले दोन प्रहर आहेत. आतांसा कुठं दिवस कलता झालाय, आणि सभा आहे संध्याकाळच्या प्रहरी ना ? मग इतक्यांत कोण आहे तिकडं ? कालपासून एकदां तरी भेटलीस का ? सकाळीं शेतावर येते वेळीं पहात होतों, पण तूं कुठली दिसायला ! तुझ्या पायावर नक्षत्र पडलेलं ! हवं तेव्हां कधीं दर्शन होईल तर शपथ !

**सुशीला** :—सकाळ संध्याकाळ दर्शन घ्यायला मी का कोणी देवी आहे ?

**संभाजी** :—होना ? म्हणून तर भक्त दर्शनासाठीं इतका भूकेलेला असतो !

**सुशीला** :—कामधंद्याकडं दुर्लक्ष करून देवीचा फाजील ध्यास धरणाऱ्या या फाजील भक्तांना चांगली शिक्षा केली पाहिजे.

**संभाजी** :—देवीनंच शिक्षा फर्मावल्यावर बिचारा भक्त काय करणार ! फार झालं तर तो तिचा अधिक ध्यास धरील आणि तिच्या दारी धरणं धरून बसेल कीं, हे देवते ! प्रसन्न हो ! ( तिच्यापुढं गुढगे टेकून हात जोडतो. )

**सुशीला** :—इश्य ! हें काय ? माझ्यापुढं गुढगे टेकून हात काय जोडतां ?

**संभाजी** :—अरे हो ! हें माझ्या लक्षांतच आलं नाहीं.

**सुशीला** :—छे छे ! मुळीच लक्षांत आलेलं नाहीं तुमच्या ! आतां जे झालं तें अगदीं आपोआप, तुम्हांला न कळत झालं ! खरं ना ?

**संभाजी** :—अगदीं खरं !

**सुशीला** :—हे लपंडाव कळतात बरं मला !

**संभाजी** :—आनंदाची गोष्ट आहे. मग आमचं भाग्य लौकरच उजळणार म्हणायच ?

**सुशीला** :—हल्लींहल्लीं कीं नाहीं, तुमचा मला फार राग यायला लागला आहे !

**संभाजी** :—तो कां म्हणून बुवा ?

**सुशीला** :—या तुमच्या लोचटपणामुळं ! एकदां का मी तुमच्या तावडींत सांपडले कीं, प्रहरच्याप्रहर सोडीत नाहींत तुम्हीं मला.

**संभाजी** :—किती खोटं बोलतेस ग ? म्हणजे आतां मी धरलंय वाटतं तुला ?

**सुशीला** :—हातानी नाहीं नजरेनं. ही नजरबंदीची जादूगिरी फारच वाईट बाई ! नजरेच्या माऱ्यानं दुसऱ्याच्या हृदयाला घायाळ करायची ही खोड फार वाईट नाहीं ?

**संभाजी** :—मग काय, आम्हीं आमचे डोळे सुद्धा मिटून घ्यावेत की काय ?

**सुशीला** :—तसं केलंत तर मात्र फार—बरं होईल !

**संभाजी** :—म्हणजे मी डोळे मिटून घेतल्याबरोबर तुला पळून जाता येईल खरं ना ?

**सुशीला** :—पळून ? आणि ती काय म्हणून ? तुम्हांला भिऊन कीं काय ? काय हो ? तुम्हीं स्वतःला एकढे कोण समजतां ?

**संभाजी** :—माणूस ? एका माणसाच्या जीवाचा माणूस !

**सुशीला** :—अस्सं ! माणूस ! आणि एका माणसाच्या जिवाचा माणूस ? पण मी तुम्हांला असं विचारतें; त्या माणसानं तुमची माणूसकी जाणली नाहीं तर ?

**संभाजी** :—नाहीं जाणली तर हरि हरि ! धरली पढंरीची वारी।

**सुशीला** :—आणि हरिनाम सोडून दुनियेच्या कुटाळक्या करी !

**संभाजी** :—हां-हां-हां ! सांभाळून बोल ' बेअब्रूची फिर्याद करतील वारकरी ?

**सुशीला** :—हिम्मत आहे का त्यांना ? साधू म्हणून भोंदुगिरी करणारे किती तरी सांपडतील शोधूं गेल्यास.

**संभाजी** :—ते जाऊं द्या ! मधेंच भलताच विषय काढायची फार सवंय तुला ! हो आपलं काय बरं चाललं होतं ? हो ! हेंच तें कीं, जर त्या एक माणसाचं आपल्या माणसावर प्रेम नसतं, तर तें माणूस ऊनतान्ह, रात्र अपरात्र म्हणतां त्याच्या एका माणसाच्या भोंवती कां बरं पिंगा घालीत राहिलं असतं ? सुशीला, आतां किती दिवस चालायची ही लपवा लपवी. आतां सांगून टाकूया एकदां घरच्या मंडळींना कीं, आमचं एकमेकावर प्रेम आहे म्हणून.

**सुशीला** :—बरं का ? आज सकाळीं एक गम्मत झाली ! मी आपली गाणं म्हणत होतें एका माणसावरनं.

**संभाजी** :—म्हणजे माझ्या-वरनं-

**सुशीला** :—एका माणसावरनं म्हणते ना ?

**संभाजी** :—बरं-एका माणसावरनं म्हणजे माझ्यावरनं.

**सुशीला** :—बरं बरं, तुमच्या वरनं !

**संभाजी** :—( टाळी वाजऊन ) अरे त्याच्या मारी टोपी-

**सुशीला** :—तेव्हां कीं नाहीं, भाऊनं ऐकलं, आणि त्या लबाडानं सारं ओळखलं. त्याला सगळं ठाऊक आहे हं आपल्याबद्दल.

**संभाजी** :—बाजीरावाला ना ? त्याला ठाऊक असूं दे ग ! बाजीराव माझा दोस्त आहे. पण या वाडीतल्या साळकाया माळकाया आणि म्हातारेकोतारे कानांत वारा भरलेल्या वासरासारखे आम्हांला पाहिल्याबरोबर टवकारून बघतात, आणि वाऱ्यावर काहींतरीच भकत सुटतात, त्यांचाच राग यायला लागला आहे मला ! करून सवरून भागलेले आणि आतां देवपूजेस लागलेले हे, यांना आतां जगाच्या उठाठेवी हव्यात कशाला ?

**सुशीला** :—दुसऱ्या घरच्या कुटाळक्या करीत रहायची सवयच आहे या लोकांना हो, बाई ! चला ना आतां. नाहींतर सभेला जायला उशीर होईल !

**संभाजी** :—मग, अस्मादिकानीं आतां सभेला यायलाच पाहिजे का ?

**सुशीला** :—हें काय बाई विचारणं ? आपण आला नाहींत तर शोभा येईल का त्या सभेला ?

**संभाजी** :—आणि म्हणूनच तूं इकडं आलीस वाटतं मला शोधायला ?

**सुशीला** :—मग काय करणार ! भाऊला दिली लोणकढी थाप—

**बाजीराव** :—( एकदम येऊन ओरडतो ) साप-अरे साप—

**सुशीला** :—अग आई ग ! ( किंचाळून संभाजीला मिठी मारते. )

**बाजीराव** :—काय हो राजश्री ? काय हें ? माझ्या समक्ष माझ्या बहिणीला मिठी मारतां ? [ दोघंही लाजून दूर होतात ]

**संभाजी** :—अरे पण तुझा साप कुठं आहे ?

**बाजीराव** :—साप शोधायला गेला आपला बाप ! अरे कुठला साप नि कुठला बाप ! आमच्या सुशेच्या भाषेत सांगायचं म्हणजे दिली एक लोणकढी थाप ! म्हटलं करावी तुमची गम्मत. चोरून चोरून, लपून छपून गुलुगुलु गोष्टी करायला तुम्हीं काय मुंबई पुण्याच्या कॉलेजातलीं प्रेमी युगुलं समजतां कीं काय रे आपल्याला ? ऑं ? काय या बाजीरावाची भीतीच नाहीं तुम्हांला ?

**संभाजी** :—बाजीराव, असा रागाऊं नकोस बुवा ! ही आताच भेटली मला म्हटलं जाऊंया बोलत बोलत.

**बाजीराव** :—अस्सं ? म्हणजे आतां तुम्हीं या वाटेनं बोलत चाललां होता थांबला नव्हतां ?

**संभाजी** :—छे ! बोलतच चाललों होतों.

**बाजीराव** :—अक्षरशः खरं बोलणारावर खोटं बोलण्याचा आरोप करायची कुणाची छाती आहे म्हणा ! बाकी तुमच्या सारखे दोन हाताचे चार हात करायच्या भानगडीत पडलेले प्रेमी जीव अगदीं नेहमींच खरं बोलत असतात ? चुकून सुद्धां कधीं खोटं बोलत नाहींत.

**संभाजी** :—हें मात्र खरं :

**बाजीराव** :—काय तें ? अरे खरं काय ?

**संभाजी** :—कांहीं नाहीं--कांहीं नाहीं--राहीलं !

**बाजीराव** :—अरे रहाणारच. बोलणार काय तुम्हीं माझ्या समोर ? छाती आहे तोंडांतून ब्र काढायची ? मुद्दे माला सहीत पकडल्यावर, चोराची मोर होण्याची काय माय व्याली आहे ? काय ताई ? अग दडतेस काय ? अशी इकडं ये. अशी उभी रहा समोर. आतां सांग, गांवातल्या सगळ्या स्त्रीया जमा करून सभेला घेऊन चल म्हणून सांगीतलं होतं तुला ?

**सुशीला** :—होय.

**बाजीराव** :—मग, ती सभा राहीली तिकडं आणि तूं इकडं ?

**सुशीला** :—भाऊ, खरंच सगळ्या जणींना वर्दी दिली आणि मी या बाजूनं जात होतें इतक्यांत—

**बाजीराव** :—हे राजश्री भेटले. समजलं ! बाकी एखाद्या नाटकांत चतुर नाईकेची चतुर भूमिका पुढं मागं दिली पाहिजे तुला.

**संभाजी** :—हो ! बरी आठवण झाली. बाजीराव, आतां तूं नाटक करशील ना, तेव्हां त्यांत मला सुद्धां एक लहानशी—म्हणजे नायकाची भूमिका दिलीस तरी करीन मी.

**बाजीराव** :—हो हो ! अवश्य देईन.

**संभाजी** :—हो हो – देच.

**बाजीराव** :—पण कायरे ? नाटकांत भूमिका करायचा एवढा सोस तुला आजच कां लागला ? ही भलतीच तळप आजच कशी बुवा निर्माण झाली ! आमच्या ताईला नाटकांत नायिकेचं काम द्यायचं नांव काढल्याबरोबर त्या नाटकांतला नायक व्हायला स्वारी अगदीं एका पायावर तयार ! वः ! ही अंदरकी बात आम्हांला कळते बरं श्रीयुत ?

**सुशीला** :—भाऊ, तूं सभेला जायचं सोडून इकडे कशाला आलास ?

**बाजीराव** :—भले शाब्बास ! मलाच दमदाटी ? अग, तुझा कुठं पत्ता नाहीं म्हणून मला इकडं यावं लागलं ! त्या रमाकाकू, त्या गोदूमावशी, त्या शारदाबाई, त्या गंपूच्या आई–अगदीं झाडून साऱ्याजणींना विचारलं पण प्रत्येकीचा आपला जबाब एक. “ इथं होती कुठं गेली ” शेवटीं हा प्रकार ऐकून मी सुद्धां थक्कच झालों ! म्हटलं भूमीगत झालीस कीं काय ? कारण, भूमीगत होण्यात स्त्रियांची बाजू अरुणाबाईनीं अगदीं उज्वल करून ठेवली आहे ना ? तेव्हां म्हटलं काय नेम तसंहि व्हायचं कदाचीत.

**सुशीला** :—बोलशील तरी किती बाई ! आतां उशीर नाहीं का झाला सभेला जायला ?

**बाजीराव** :—बरं का संभाजी, प्रेमाच्या राज्यांत या पोरी कसा लंपडाव खेळतील तें एक देवच जाणे !

**संभाजी** :—बाजीराव, आतां तुझ्यावर भिस्त आहे बुवा सगळी!

**बाजीराव** :—छे बुवा ! तें आपलं तुमचं तुम्ही पहा, हसाखेळा, नाहींतर गांव सोडून पळा ! मी आपला नामानिराळा.

**सुशीला** :—करून सवरूनच बरं?

**बाजीराव** :—बाशिंग बांधून ये! मंगलाष्टकें म्हणायला तयार आहे मीं. करून सवरून नामानिराळा मी राहूं? तुमचा ताशा वाजवून देऊं आणि अण्णांचे जोडे मी खाऊं?

**संभाजी** :—अरे आमच्यासाठीं!

**बाजीराव** :—तुमच्यासाठीं हे ठीक पण माझ्या टाळक्यात बसेल ना अण्णांची काठी? अरे हो! तुमच्यासाठी एक कविता मात्र करून आणली आहे.

**सुशीला** :—म्हणजे? भाऊ, तूं कवि सुद्धां झालास कीं काय?

**बाजीराव** :—अग कविच काय, पण गवई सुद्धां आहे मी. सर्व गुणसंपन्न स्वारी आहे आमची. तुला काय वाटलं, तुला तेवढं गातां येतं? बोला कशाला! गाऊनच दाखवतो.

तुमची पहातांच जोडी,
वाटे मजला अविट गोडी!
ही तारका चंद्र तू रे,
गगनींचे जणू भासती तारे
भ्रंगा परि तूं वनवन फिरशी,
कमलिनी तुझी वेडी!!
तूं सागर रे ही सरिता—
सांगा मजला कां ठकवितां?
वचन तुमचे जपूनी ठेवा,
घालूनी जीवाची घडी!!

काय? आवडली की नाहीं कविता तुम्हांला? खुष अहांत ना?

**संभाजी** :—अगदीं बेहद्द!

**सुशीला** :—भाऊ, सभेची आठवण आहे का?

**बाजीराव** :—अरे हो! दोन वाजायला आले नाहीं का? चला, आपल्याला सर्व तयारी केली पाहिजे. (जातात)

[ पडदा ]

# प्रवेश ३ रा

[ स्थळ :—हणमंतरावाच्या घराचा ओटा. हणमंतराव रागारागानें बडबडत बाहेरून येतात. व यमुनाबाई हणमंतरावांच्या पत्नी घरांतून बाहेर येतात. ]

**हणमंतराव** :—कमाल केली या कार्टीनं! काल त्या सभेंत बेशरमपणा करून माझ्या नांवाला काळीमा फासायची वेळ आणलीन!

**यमुना** :—काय झालं?

**हणमंत** :—व्हायचं काय? सारा गांव छी: थू: करतो आहे! काल त्या सभेंत मारे ही त्या बायकांत त्यांच्यासमोर भाषण करायला उभी राहीली! त्या संभाजीबरोबर हंसत खिदळत होती! संबंध दिवस सभेच्या आवारांत यांचा थिल्लरपणा चालला होता म्हणून प्रत्येकजण सांगतोय. आम्हां मराठ्यांच्या मुलींनां त्यांतून माझ्यासारख्या जातीवंत मराठ्याच्या बहिणाला हे असले चावट चाळे काय कामाचे? अशानं आमच्या बेचाळीस पीढ्यांचा "उद्धार" होईल ना?

**यमुना** :—तरी मी काल तुम्हांला सांगत होतें कीं सभेला जा म्हणून. पण माझं ऐकतं कोण? उगीच नाहीं पाठीशी लागले होते! मला हें सगळं ठाऊक होतं? साऱ्या गांवात झालेय नांवाची बदनामी?

**हणमंत** :—तुझ्या सांगण्याप्रमाणं काल मी सभेला गेलों नाहीं हिच चूक केली. आतां बोलून काय उपयोग? दृष्टीसमोर कांहीं कमी जास्त झालं असतं तर बरोबर हजेरी घेतली असती एकएकाची.

**यमुना** :—तुम्हीं कांहीं म्हणा, पण वन्संचं हें लक्षण काहीं ठीक दिसत नाहीं.

**हणमंत** :—मला सुद्धा तसंच वाटायला लागलंय आतां.

**यमुना** :—मी कितीतरी दिवस सांगतें आहे. पण तुम्हांला त्याची किंमत वाटेल तर ना? वन्सं सारख्या त्या संभाजी भोंवती घिरट्या घालीत असतात.

**हणमंत** :—त्या संभाजीचं घराणं कुठं आणि आमचं घराणं कुठं? आमच्या पायाजवळ बसायची तरी त्यांची योग्यता आहे का? त्या संभ्याला तरी कांहीं वाटायला पाहिजे-आपण कुणाच्या मुलीबरोबर दोस्ती करूं पाहतों याची कांहीं जाणीव त्याला—

**यमुना** :—आपलाच माल चोख नाहीं तिथं दुसऱ्याला तरी बोल—कशाला म्हणा ?

**हणमंत** :—तें सुद्धां खरं आहे ? आम्हां मराठ्यांच्या मुली जर अशा मर्यादा तोडूं लागल्या तर महाराष्ट्रांत मराठकी मुळी शिल्लकच राहीली नाहीं म्हणायची ! तें कांहीं नाहीं. या पोरीचे चांगले कान उघडतो. बहिण झाली तर काय झालं ?

**यमुना** :—आणि भाऊजीना सुद्धां चांगला दम भरा. त्यांचीच फूस आहे बरं ही सगळी ?

**हणमंत** :—अस्सं ? त्याला हें पसंत आहे ?

**यमुना** :—असायलाच हवं. त्यांची आणि संभाजीची मैत्री आहे ना ?

**हणमंत** :—अरेच्या ! हा लेकाचा बाजीरावच झाला ! तिकडं शहरांत जाऊन काय वाटेल तो धांगडधिंगा घाल म्हणावं. माझ्या खाजगी व्यवहारांत मी कुणाचीहि लुडबुड चालूं देणार नाहीं .

**यमुना** :—त्यांना काय, मराठ्याची मुलगी म्हारानं नेली तरी त्यांना त्याचं कांहींच वाटत नाहीं. परवांच अगदीं मोठं तोंड करून सांगत होते कीं, म्हणे मराठ्यांच्याच काय पण ब्राह्मणांच्या मुली सुद्धां आतां महारा चांभाराबरोबर लग्न करूं लागल्या आहेत ! काय बाई तरी विचित्र ? आम्हांला नाहीं असलं खपायचं. माझे बाबा सांगायचे जातीसाठीं माती खावी पण नेकजातपणा सोडूं नये.

**हणमंत** :—तुझ्या वडिलांची गोष्ट कुठं ? खरे अस्सल मराठे ते ! मराठा-मराठ्यालाच ओळखतो. तुझं लग्न झाल्यावर आठच दिवसांनीं त्या समोरच्या माळादर गांठ पडली मामांची नि माझी. असा छातीपुढं काढून उभा राहीलों त्यांच्या समोर. तीन गुद्दे मारले माझ्या छाताडावर त्यांनीं आणि म्हणाले—मर्द मराठा आहेस बेटा ! मराठ्याचं नांव कधींहि बुडवणार नाहींस तूं. आणि म्हणून माझ्या लाडक्या लेकीला तुझी सखी केली आहे. तिला जीवाच्या मोलनं जप. आणि जातीच्या तोलानं वागव. अजून ते शब्द आठवतात आणि आगांवर मूठभर मांस येतं ! ( बाजीराव व सुशीला बाहेरून हासत खिदळत येतात. हणमंतरावांना पहातांच दोघंही चपापतात. )

**हणमंत** :—काय रे ? काय झालं ? असे दांत काय काढतां ? नंगा नाच चांललाय कीं काय ? काय आहे काय ? कां नाटकाच्या थिएटरांत बसला अहांत खू खू खू — ह्यॉं ह्यॉं ह्यॉं ऽऽऽऽ करतां अहांत ती ?

**सुशीला** :—अण्णा, असे रागावतां काय बरं ? आम्हीं हसूंच नये कीं काय ?

**हणमंत** :—हसायला काय इथं तमाशा चालला आहे ?

**बाजीराव** :—म्हणजे हा जुलूम झाला ! तमाशा असेल तिथंच हसावं आणि इतर ठिकाणी काय रडत बसावं ?

**हणमंत** :—बाजीराव — तूं हल्लीं फार शेफारत चाललायस ?

**बाजीराव**:—अण्णा, रागावलांत तुम्हीं ? मला वाटलं आपलं रोजच्या-सारखं थट्टेवारीच चाललंय सगळं.

**हणमंत**:—थट्टामस्करी कुणाबरोबर करावी, मर्यादेनं कसं वागावं हें तुम्हां — आजकालच्या पोरांना मुळीं कळतच नाहीं. आणि म्हणून असं वागावं लागतं.

**यमुना** :—गवत गुळी सगळं सारखं ! वडील धाऱ्याची मुळी पर्वाच नाहीं.

**सुशीला** :—वहिनी, आज तुम्हीं दोघानीं हें आरंभलंय तरी काय बाई ?

**बाजीराव** :—आज काहीं तरी खास घडलेली घटना दिसतेय.

**हणमंत** :—होय. खास घडलंय.

**बाजीराव** :—नाहींतर आमची वहिनी इतक्या जोरजोरानें कधींच बोलली नसती !

**यमुना** :—मी नेहमींच जोरानें बोलतें ! तुम्हांला नि वन्सना सुद्धां ! तुमचा नेहमीं माझ्यावर राग ?

**सुशीला** :—अग वहिनी, मी असं चुकून तरी कधीं बोललें का ?

**बाजीराव** :—आणि वहिनी तूंच सांग, मी तरी तुला असं कधीं बोललो का ? मी साऱ्या लोकांना सांगतो, माझी वहिनी जरी तोंडाळ असली तरी अंतःकरणाची प्रेमळ आहे ! जातीसाठीं माती खाईल पण नेकजातपणा घालवणार नाहीं.

**यमुना** :—आणि म्हणूनच वाटतं तुम्ही दुसऱ्यांचं नांव बदनाम करण्याची पाळी आणतां ?

**बाजीराव** :—तें कसं काय बुवा ?

**हणमंत** :—कसं काय ? काल त्या सभेंत काय धिंगाणा घातला होता या सुशेनं ?

**बाजीराव** :—धिंगाणा ? काय ग, काय म्हणतात अण्णा ?

**सुशीला** :—माझा बाई समजच होत नाहीं ; काय म्हणतात देव जाणे !

**हणमंत** :—देव कशाला ? सारा गाव जाणतो आहे तुमचे गमजे !

**सुशीला** :—काय झालं बाई असं आमच्या हातून ?

**हणमंत** :—काय त्या सभेंत मारे कंबर कसून तूं एखाद्या निर्लज्ज स्त्रीसारखी व्याख्यानं झोडीत होतीस ?

**बाजीराव** :—( मोठ्यानें हंसतो. ) हात्तेच्या ! हेंच का ? अहो अण्णा, जगाच्या मागं किती हो हे तुम्हीं ! अहो, आज जिकडं तिकडं पुरुषांपेक्षा स्त्रियाच आघाडीवर आहेत.

**हणमंत** :—आम्हांला त्या तसल्या आघाड्या नको आहेत. देशकार्याच्या नांवाखालीं जात धर्म न ओळखता कुणाचाही हात धरून वागायचं आणि त्यालाच शेवटीं नवरा करून घ्यायचा हें असलं मोठेपण नको आहे मला. आणि त्या संभ्याबरोबर भर सभेंत खेकट्या पिटींत हिंडायला शरम नाहीं वाटली तुला ? काय ग ?

**बाजीराव** :—अण्णा, काय डोकं फिरलं कीं काय तुमचं ?

**हणमंत** :—चूप. कुणाला विचारतोस तूं हें ?

**यमुना** :—पहा, पहा ! हीच कीं नाहीं तुमची मर्यादा ?

**बाजीराव** :—अण्णा, चुक झाली माझी! वडिलांनीं लहानांना नेहमींच सांभाळलं पाहिजे ! अण्णा, सुशीलेनं काहींच वाईट केलेलं नाहीं. ती योग्य मार्गानंच चालते आहे. तुम्हीं उगाच तिच्याबद्दल मनांत वाईट का बरं आणतां ?

**हणमंत** :—सारा गांव माझी नालस्ती करतो आहे म्हणून !

**बाजीराव** :—एवढंच ना ? अण्णा, आतां गांवाच्या निंदानालस्तीची भीति न धरतां आपलं कार्य आपल्याला केलंच पाहिजे. या अशिक्षित गांवकऱ्यांना शहाणे करून जगांत चाललेल्या सुधारणा त्यांना पटवून दिल्या पाहिजेत. आणि हें करतांना त्यांच्या निंदेचे-नालस्तीचे, विषारी बोल आपल्याला सहन केलेच पाहिजेत ! आज आपण जर असं केलं नाहीं, तर आम्हीं जगाच्या पाठीवर जगायला नालायक ठरूं !

**यमुना** :—या मोठ्या शास्त्रज्ञाच्या गोष्टी आम्हांला नकोत. आमचे वाडवडील चालले तसंच आम्हांला चालायचंय. आम्हीं धर्म बुडवायला नाहीं बसलोंत! काय ऐकतां यांचं? अशा गोष्टी सांगून, हे आजच तुमच्या डोकीवर नाचूं लागतील! आम्हाला अजून जगायचंय जगांत.

**सुशीला** :—वहिनी, आज फार जोर धरलास बाई तूं! नणंदेचा सूड उगवायचा विचार दिसतो आहे तुझा.

**यमुना** :—नणंद जर भावजयीच्या नांवाला काळिमा लावायला लागली, तर भावजयीनं तिचे डोळे उघडायला नकोत का?

**सुशीला** :—अण्णा, असा काय अपराध माझ्या हातून घडला बरं? वहिनीचं हें बोलणं मला नाहीं सहन होत!

**हणमंत** :—अगदीं खरं बोलतेय ती! त्या सभेत काल नायकिणीसारखी नाचलीस! त्या संभाजीच्या मागून फिरतेस! त्याच्याबरोबर गुलगुल गोष्टी करीत रानोमाळ हिंडतेस! हें आम्हांला समजत नाहीं असं वाटतं तुला? तुझे सगळे उद्योग समजतात बरं आम्हाला?

**बाजीराव** :—मग त्यात काय झालं? सुशीलेनं स्वतः होऊन आपला जोडीदार शोधला तर त्यांत बिघडलं कुठं?

**हणमंत** :—कोण तो संभाजी? त्या साबाजीचा भाऊ? आणि हिचा जोडीदार? म्हणजे ही त्याच्याबरोबर लग्न करायला तयार झाली कीं काय?

**यमुना** :—घ्या! ऐका हें! आतां जगच उलटं झालं म्हणायचं!

**हणमंत** :—बाजीराव, तुझं डोकं ठिकाणावर आहे का? अरे आम्हीं अस्सल मराठे, आमच्या बहिणीनं त्या आडमराठ्याच्या मुलाबरोबर लग्न करायचा घाट घालावा म्हणजे आमचा अधःपात आहे! मला हें कालत्रयीं पसंत पडणार नाहीं

**बाजीराव** :—मला मात्र तें पूर्ण पसंत आहे.

**हणमंत** :—बाजीराव—

**बाजीराव** :—अण्णा—ऐकून घ्या. आम्हीं अस्सल, तुम्हीं कमू अस्सल आम्हीं मोठे, तुम्हीं लहान, आम्हीं मराठे, तुम्हीं कुळवाडी असं म्हणायचे आणि फुकट वादविवाद माजवायचे दिवस संपले आतां! अण्णा, आमच्या या देशांत जाती आणि पोट जाती इतक्या आहेत कीं त्यांच्या उच्चनीचतेबद्दल

जर आपण निरर्थक खल करीत बसलों तर जगाच्या अंतापर्यंत आमचे वाद मिटायचे नाहींत आणि आम्हांला सुखाचे दिवस लाभायचे नाहींत. खोट्या जातीयवादांना उराशीं बाळगून यापुढंहि जर आम्हीं पूर्वीप्रमाणेंच वागूं लागलों तर आमच्या देशाच्या अमोल स्वातंत्र्यसुखाला आम्हीं आचवल्याशिवाय रहाणार नाहीं. तेव्हां म्हणतो, अण्णा, असा हा आडदांडपणा करून स्वतःचा सत्यानाश करून घेण्यांत काय बरं फायदा ?

**हणमंत** :—हें तुझं पांडित्य मला नको आहे. त्या सभाजीबरोबर या माझ्या बहिणीचा संबंध मी कधींहि जुळूं देणार नाहीं.

**सुशीला** :—अण्णा ! ( नकळत रडूं लागते. )

**यमुना** :—हें काय ? हें बाई भलतंच !

**बाजीराव** :—अण्णा, या बाबतींत तुमचा माझा वाद झाल्याशिवाय रहाणार नाहीं. सुशीला जशी तुमची बहिण आहे तशीच ती माझी सुद्धां बहिणच आहे ! तिच्या हितासाठीं झटणं हें माझं कर्तव्य ठरतं. तिच्या इच्छे-विरुद्ध जर तुम्ही तिला वागवलीत तर तिचं आयुष्य फुकट जाईल !

**हणमंत** :—जाऊं दे ! गेलं तर गेलं. मला त्याची पर्वा नाहीं.

**बाजीराव** :—अण्णा, पाठच्या बहिणीच्या सुखदुःखाबद्दल असले उद्गार काढणं तुम्हांला शोभत नाहीं.

**हणमंत** :—माझी शोभा विचारतोस ? आज इतकीं वर्षे तुम्हांला पोटच्या पोरासारखी सांभाळली, त्याचं प्रायश्चित देतां काय हें ? बरस तें कांहीं नाहीं, माझंच म्हणणं खरं झालं पाहिजे. सुशे, यापुढं तूं जर त्या संभ्याच्या नादी लागशील तर तंगडी तोडून ठेवीन.

**सुशीला** :—अण्णा, नका हो असे छळूं मला ! हवी तर मला विहीरींत लोटून द्या. पण हें बंधन मात्र घालूं नका !

**यमुना** :—पुढं तोंड करून बोलायला कांहीं वाटतंय का मनाला ?

**बाजीराव** :—मग ती भिणार कुणाला ? तिचं हीत तिला कळतंय ! तुमच्या गोठ्यांतच दावणीला अडकून रहाणारी ती आतां गरीब गाय राहीली नाहीं समजलांत ?

**यमुना** :—मराठ्याच्या मुलीला असला फाजीलपणा शोभत नाहीं.

**बाजीराव** :—मराठ्याच्याच काय, पण भारतांतील सर्व जातींच्या कुमारी-कानीं आपलं भवितव्य स्वतःच ठरवून योग्य मार्ग आखून राष्ट्राच्या कल्याणासाठीं झटायचा काळ आला असतांना तुमची पोकळ मराठकीच गाजवून त्याचं कल्याण कसं होणार ? छत्रपती शिवाजी महाराजांच्या वेळीं, महाराष्ट्राच्या रक्षणासाठीं आडून साऱ्या मराठ्यांच्या मुली या ना त्या युक्तीनं राष्ट्राकाजासाठीं झटत होत्या. कंबरेला समशेर बांधून रणांगणावर शत्रुला नामोहरम करीत होत्या. अतुल शौर्य गाजवून आपल्या पराक्रमाला शोभेल असा शौर्यवीर पराक्रमी पती निवडीत होत्या. ज्या मराठ्यांच्या स्त्रीया हातीं समशेर धरून वैऱ्याला दे माय धरणी ठाय करून सोडीत होत्या त्याच मराठ्यांचे वंशज तुम्ही आपल्या बहिणींना पायांतल्या वाहणेप्रमाणं राबवायला पाहतां ? त्यांचं स्वातंत्र्य पायदळी तुडवतां ?

**हणमंत** :—बाजीराव, माझं डोकं फिरलं आहे आतां ? चालता हो माझ्या समोरून. जा. ए दिवटे, तूंसुद्धां चालती हो इथून. उद्यांपासून तुझा बरोबर बंदोबस्त करतों. त्या फाजील माणसाला चांगला मार्गावर घेतों. त्या साबाजीलाच जें काय सांगायचें तें सांगतों ! माझ्याशीं बरोबरी करायला पहातो ? तें कशाला ? हा अस्साच जातों आणि त्या चढेल माणसाचे कान उपटतों. या हणमंतरावाशीं बरोबरी ?

**यमुना** :—चला, मी पण येतं. ( दोघंही रागानें बाहेर निघून जातात. )

**बाजीराव** :—जा. पण अधिक प्रसंग मात्र ओढवून घेऊं नका.

**सुशीला** :—भाऊ, आतां मी काय करूं रे ? भाऊ ! भाऊ ! भाऊ–( रडते )

**बाजीराव** :—आतां मी तरी काय सांगूं ग ! ( आंत जातो. )

**सुशीला** :—भाऊ, तूंच कारे बोलतोस हें ? भाऊ ! भाऊ !—

( बाजीरावच्या मागून रडत रडत आंत जाते. )

★

## प्रवेश ४ था

[ स्थळ :—गांवातील एक वाट. जानू व सोनी येतात. वेळ सकाळची. ]

**सोनी** :—काय वो, झाली सोडायला शेरडं ? आजून घटकाभर सुदां दिस आला नाय, तर तुमी चाललांत शेरडांकडं ? शेरडांचं नांव सांगून गावक्या नित्या सबा करीत बसा. पुडारीपन हावं ना ? घ्या ! हिकडं बायका पोरं मेली तरी मरूं देत ! पन एकदांचं तुमी सुकी व्हा !

**जानू** :—अग पर गांवाला वर्दी देयाची हाय. वर्दी देतो गांवास नि मग शेरडं सोडतों चरायास. आज गांवची चाकरी हाय ना माज.

**सोनी** :—ही फुकट करून चाकरी मिळंल का भाकरी ?

**जानू** :—अग पन हें काम काय आजचंच हाय काय ? आमच्या इस डोया चाल्लंय ना हें ?

**सोनी** :—आतां सोडून द्या तं. म्हनावं माज यळ नाय. या चाकरीन काय प्वॅाट जळतंय ? त्यासाटी सकाळपासनं सांजपावत मातीत त्वांड खूपसायस हवं ! न्हांवदे ती चाकरी नि नोकरी. चला परत. तिकडं पोरानी घातलाय पिंगा. एकाला कोंड्याची भाकरी नको त दुसरं हरकाच्या शिळ्या हुंडीला शिवत नाय ! तुमची धाकटी लाडकी अंबा, बसल्याय रुसून दुदासाठीं. मेलं अमवास्ये पुर्नीमेस दुदाचा थेंबा मिळतांना मारामार, नि हे पोरीस रोज दुद देव तरी कुटनं ?

**जानू** :—दोन शेळ्या इयाल्या त्यांची बी पोरं मेली !

**सोनी** :—राकनाराचा पायगुन !

**जानू** :—मग तूं राक उद्यापसनं !

**सोनी** :—आनि तुमच्या पुढ्यांत काय घालूं ? चायनीचं आंकूर नि आळवाचा मोटला ? त्यांत घालाया मीट तरी मिळाया हवं ना ? मी जाते शेरडांकडं नि तुमी जा गांवकीस. पोरास्नी देवयां नदींत लोटून कीं मोकळीक झाली !

**जानू** :—अग पर असी वैतागतेस काय ?

**सोनी** :—वैतागू नको ? त काय करूं ? संबंद दिस मरीमर मेले त एकट्याचं प्वॅाट भरायची मारामारी ! मग ह्या चार पोरास्नी नि तुमाला घालूं काय माजी हाडं ? कसं जगायचं ? या दळीदरांत कसं काडायच दिस ? कसी वस्ती करायची या गांवांत ? भिकारडा ग बाय अगदीं भिकारडा हा गांव ! माज्या आयबापाला दुर्बूदी झाली नि या भिकारड्या गांवात मला देली ! या म्होरं या गावांत न्हानं नको—

**जानू** :—अग पर धा न्हव-इस डोया गेल्या ह्या गावांत आमच्या ! जगलं व्हत ना आमचं वाडवडिल ? दिंवस काडल ना त्यांनी या गावांत ? त्यांच्या नातूपंतूच्या खापरपंतूचे पंतू आमी, काय मेलो नाय ते आमी ?

**सोनी** :—आज पावत तुमी जगलाव. पन आतां तुमच्या पोरांवर मरायची पाळी आली ना ?

**जानू** :—काय मरत नाय कोन ! अग देव तारी त्याला कोन मारी !

**सोनी** :—मग घ्या हातात एक टाळ नि बसा करीत भजन देवाचा ! सांज धयभाताचं ताट देव धाडील आभाळांतनं !

**जानू** :—अग देवाची मर्जी झाली त तसं बी व्हतं !

**सोनी** :—मग चार चार दिस उपासी का ऱ्हातां ? मारावी हाक देवाला नि सांगावं धयभाताचं ताट आनायला.

**जानू** :—अग यडे, आमच्या देवादिकांच्या कता कदी आयकल्यायस तूं ? तुला बाकुला काय धोंड ठावं ? अग देवावर जसी सरदा तसं फळ ! देवादिकांच्या कतावर एक एक तमाशाचा वग लागला मजे डोळ्यातनं आसूं गळतात ! कुना घरी पानी भरतो, त कुनाची गुरं चारतो !

**सोनी** :—मग तुमी आपली मेंडरं राकाया सांगाना तुमच्या देवाला ! अवो, तुमची ही पुरानांतली वायंगी ऱ्हावंदेत पुरानांतच. अगोदर सांजच्या वक्ताचं बगा. आदी घरास चला नि आपली पोरं आवरा बगूं ! मला जावं दे कुटं तरी धंद्यास. आज नाय गेले पैरी त उद्यां पळल साऱ्यांची खैरी. ठावी हाय ?

**जानू** :—गावातनं लौकर जावन यतो हं ? तोवर समजाव पोरास्नी.

**सोनी** :—आतां हद्द झालीं या कर्मापुढं ! अवो पन दुसऱ्याकडं राबायास जायाचं हाय, तं यळावर नाय गेलें त तितं गेल्यावर काय माजा बाबा हाय तो देयल माज पैरेपन ? ऱ्हावंदे समदं तुमचं. चला परत आदीं. तुमला मेली ह्या परपंचाची खातरच नाय ! बोलूं तरी किती ? माजं त्वांड दुकायास लागलं ही किटकीट करून.

**जानू** :—लौकर जाऊन यतों म्हनतो तरी तुजं तेच खरं !

**सोनी** :—देवा र, देवा ! आतां करूं तरी काय ह्या ध्यानास ? माजी अगदीं पुरी छळणूक ! छळवाद्या–मला अगदीं पुरी छळ ! !

**जानू** :—चल, चल. डोक्यांत राकुंडी नको घालूं असी ! याड कुटली ! सिमग्याचं सोंग ! त्या जिबंस काय हाड हाय ? सोंग नायतं ? चल चल परत. आतां झालं मन थंड ? चल—

**सोनी** :—झालं मन थंड ! माजे कडस बसून गुलुगुलु बोलायास येतांबा यनां तुमी, तवां झालं माजं मन थंड ! काय बाय तरी मेलं इपरीत ? कोंबड्यानं क्वॅाक केलान का उटायचं तं राती चंद्रम डोचक्यावर एयल तवां निजायचं ! दिसभर मरीमर मरायचं नि सांचं पदरांत पडलं तं घेयाचं, राती पोरांच्या पुटं निखाट करून रांदून घालायचं ! हें सारं करीपावत जीव जायास येतो माजा ! कसं तरी आंग टाकायचं जमिनीवर, डोळा लागला न लागला तोच झाली तुमची ढास सुरु. अख्खा दिस इड्या फुकून फुकून सारा धूर छातीत घालून ठेवायचा नि राती खोकून खोकून भायर काढायचा ! काय मेला तरास !

**जानू** :—रामा-रामा-रामा ! सोने-अग, माजे इडयेवर सुदां तुजा गेला नां डोळा ? तवांच तंबाकु म्हाग झाला ! आजच्या दिसांत काय इडयेचा झुरका मिळाला नाय !

**सोनी** :—अवो दिस आला डोचक्यावर ! मागं फिरायचं हाय कीं जावं मी ?

**जानू** :—हा बघ आलों चल. उगीच पिरपीर नको.

( जातात )

★

## प्रवेश ५ वा

( साबाजीरावाचें घर – साबाजीराव व संभाजी बोलत बसलेले असतात. )

**संभाजी** :—( शेतावर जाण्याच्या तयारीनें ) दादा, मी शेताकडं जाऊन येतो हं ?

**साबाजी** :—संभाजी, जरा थांब. आज तुझ्याजवळ एक गोष्ट बोलायची आहे मला. आईवडिलांच्या मागं तुझ्या प्रतिपाळासाठीं मला मुळींच कष्ट पडले नाहींत; उलट गेल्या सहा-सात वर्षांत माझ्यासाठीं तुला फारच कष्ट करावे लागले.

**संभाजी** :—दादा, तुमच्यासाठीं जर मी कष्ट सोसले नाहींत, तर मी तुमच्या पाठीला पाठ लावून जन्म घेतल्याचा काय बरं उपयोग ?

**साबाजी** :—मी हा असा अभागी जन्माला आलो ! पण तुला तरी कांहीं सुख मिळावं म्हणून मला धडपड करायला नको का ?

**संभाजी** :—तुमच्या मनाची तळमळ मला दिसत नाहीं का दादा? रात्रं-दिवस बेचैन असतो तुमचा जीव! रांगती दोन मुलं कठोर काळानं हिरावून नेली—आणि वहिनीसुद्धां आम्हांला अंतरली! एवढा मोठा दुःखाचा डोंगर सहन करूनहि दादा, तुम्ही माझ्या कल्याणासाठीं अहोरात्र झटतां हें मला कळत नाहीं का दादा!

**साबाजी** :—ती गेली! त्या दिवसापासून चूल फुंकायची पाळी तुझ्यावर आली! काय करायचं बाबा! सर्वांपुढं जातां येईल पण या कर्मापुढं मात्र कुणालाहि जातां येतां येणार नाहीं. गत आयुष्याचा इतिहास डोळ्यासमोर उभा राहिला कीं, मन कसं अगदीं अस्वस्थ होतं! जाऊं द्या तें रडगाणं! हो आज तुला काय बरं सांगणार होतों? हेंच तें! दोन तीन मुली सांगून आल्या आहेत तेव्हां जमवून टाकतो तुझ्या लग्नाचं यंदा. काय? कसं म्हणतो मी?

**संभाजी** :—दादा, पण एवढ्यांतच घाई कशाला? लग्न काय, होईल सावकाश.

**साबाजी** :—अरे, पण आता तूं लहान का आहेस? गांवांतल्या तुझ्या बरोबरच्या सगळ्या मुलांची लग्नं झाली. शिवाय हा घरचा बाहेरचा उद्योग तूं एकट्यानं किती दिवस सांभाळणार? तेव्हां जमवतो तुझ्या लग्नाचं. काय? कसं म्हणतों मी? पाहिजे तर तू मुलगी पसंत कर. तुझ्या इच्छेप्रमाणं करायची माझी तयारी आहे. तुला एकदां मार्गाला लावला कीं माझी चिंता थोडी तरी दूर होईल. कसं? काय म्हणतो मी?

**संभाजी** :—दादा, या बाबतींत एक गोष्ट तुमच्या कानावर घालायला मी कितीतरी दिवस पाहतोय, पण तुमच्या पुढं बोलायला मला धीरच होईना! पण आतां तुम्हींच माझ्या लग्नाचा प्रश्न काढलांत तेव्हां ती गोष्ट तुमच्या कानावर घातलीच पाहिजे. दादा, मी जर माझ्याच मताने एकादी मुलगी पसंत केली तर तें तुम्हाला आवडेल का?

**साबाजी** :—अरे हें काय विचारणं झालं? तुझ्या इच्छेच्या आड मी कधिंतरी येईन का? संभा, अरे आतां मला तुझ्याशिवाय दुसरं कोण आहे? आतां तूंच मला भाऊ, मुलगा—सर्व कांहीं तूंच! अरे, तूं का आतां अज्ञान आहेस? एवढा शाहाणासुरता तूं, हातात नांगर धरलास म्हणून कांहीं तूं एकाद्या अडाणी शेतकऱ्यातच मोडणार नाहींस. तुझ्यासारख्या सुशिक्षितानींच आत ।

हातांत नांगर धरले पाहिजेत, तेव्हांच हें शेतीचं काम सुधारेल आणि शेती सुधारली तरच देशांत अन्नधान्याचें उत्पादन वाढेल. प्रत्येक वर्षीं पडणारे दुष्काळ नाहींसे होतील. तेव्हां काय म्हणतो मी ? तूं जी मुलगी पसंत करशील तिच्याबरोबरच तुझं लग्न लावून देतो मग तर झालं ? आतां सांग, कोणती मुलगी तुला पसंत आहे ?

**संभाजी** :—सुशीला. हणमंतरावांची बहिण.

**साबाजी** :—वाः ! फार छान ! पोरगी पसंत पडली आपल्याला. शाबास ! मुलगी शोधून काढलीस खरी. अगदीं नक्षत्रासारखी आहे. आणि नावाप्रमाणं सुशील ! हो, पण हणमंतराव या गोष्टीला तयार आहेत ना ? नाहींतर त्यांचा फुकटचाच बडेजाव आहे फार !

**संभाजी** :—त्यांची सम्मति आहे की नाहीं हें कांहीं मला ठाऊक नाहीं, पण सुशीला मात्र अगदीं मनापासून माझ्याशींच लग्न करायला तयार आहे.

**साबाजी** :—मग हरकत नाहीं. मी विचारतो हणमंतरावांना. असली बहु-गुणी मुलगी माझ्या घरांत आली तर सोन्याचा संसार होईल माझा. कसं ? काय म्हणतो मी ? ( हणमंतराव व यमुनाबाई रागानं त्यांना जाब विचारण्यासाठीं येतात. )

**हणमंतराव** :—साबाजीराव, मी तुम्हांला एक विचारायला आलों आहे

**साबाजी** :—वसा, बसा. हणमंतराव, असे उभे का ?

**यमुना** :—आम्हांला नाहीं बसायचं तुमच्या घरांत.

**संभाजी** :—मग बाहेरच्या ओट्यावर बसा.

**हणमंत** :—साबाजीराव, या तुमच्या संभ्याबद्दल तक्रार आहे माझी.

**साबाजी** :—संभाजीबद्दल ? ती हो कसली ?

**हणमंत** :—हा माझ्या बहिणीबरोबर फाजील वर्तन करतो, थट्टामस्करी करतो, हें सगळ्या गावाला ठाऊक झालं आहे.

**यमुना** :—आणि सारा गावं आमच्या तोंडावर थुंकतो आहे !

**साबाजी** :—हणमंतराव, तुमच्या व माझ्या नांवाला कलंक लावण्यासारखं, व आमच्या तोंडावर थुंकण्याइतकं वाईट वर्तन माझा संभाजी कधींहि करणार नाहीं, याची मला पूर्ण खात्री आहे. मात्र संभाजी मला आतांच सांगत होता

कीं, तुमची सुशीला त्याच्या बरोबर लग्न करायला स्वखुशीनं तयार आहे. मात्र या गोष्टीला तुमची संमती पाहिजे.

**हणमंत** :—काय म्हणालांत ? लग्न ? माझ्या बहीणीचं तुमच्या भावाबरोबर लग्न ? मी जिवंत असेपर्यंत शक्य तरी आहे का हें ? साबाजीराव, तुम्हांला शोभलं पाहिजे असं बोलायला !

**यमुना** :—म्हणजे, सगळं पैशानं पासरी झालं की काय ? आम्हीं कुठं आणि तुम्हीं कुठं !

**संभाजी** :—म्हणजे काय ? तुम्हीं नि आम्हीं या इथं एकाच घरांत आहोत.

**हणमंत** :—म्हणजे तुमचं घराणं कुठं आणि आमचं घराणं कुठं ? जमिन-अस्मानचं अंतर आहे त्यांत. तुम्हीं आडमराठे अहांत, आम्हीं खरे मराठे आहोंत. तुमची आमची सोयरीक जुळणं शक्य नाहीं. आम्ही अस्सल मराठे आहोत.

**संभाजी** :—तुम्हीं अस्सल झालांत त्या बद्दल तुम्हांला काहीं अधिक खटपट करावी लागली कीं काय ?

**यमुना** :—अस्सल ते अस्सल ! आणि कम् अस्सल ते कम् अस्सल !

**संभाजी** :— यमुनाकाकी, विचार करून बोला ?

**साबाजी** :—हणमंतराव, हा फुकटचा वाद कशाला घालीत बसतां ? तुम्हांला आमच्याकडं मुलगी द्यायची नसली तर नका देऊं. उगीच दुसऱ्याचं मन कशाला दुखवतां ?

**हणमंत** :—आम्हीं मन दुखवतो ? आमचीच कळ काढून आणखी वर ही दादागिरी ? साबाजीराव, अगोदर या तुमच्या भावाचा बंदोबस्त करा. यापुढं जर त्यानं माझ्या बहिणीबरोबर नुसती बोलाचाली केली तरी तें माझ्या कामी येणार नाहीं. सांगून ठेवतों. आमच्या बरोबर संबंध जुळविण्याची तुमची लायकी नाहीं.

**संभाजी** :—अहो, लायकीवाले, जरा माणूसकीनं बोला !

**यमुना** :—आमची माणूसकी विचारायला तुमच्या जिवाला वाटतं का कांहीं ?

**संभाजी** :—आणि आमच्या घरी येऊन आमचीच अब्रु काढायला तुम्हांला मुळीच दिक्कत वाटत नाहीं ?

**हणमंत** :—कसली दिक्कत वाटायची? हुजूऱ्याच्या पोरानं सरदाराच्या मुलीशीं लग्न लावायचं ठरवलं तर त्याची काय शोभा होईल हें ठाऊक आहे का तुम्हांला? गाढवावरून धिंड निघेल त्याची.

**संभाजी** :—अहो, गाढवांचे सरदार, पुरे करा हा वाचाळपणा! मघापासून तुमच्या मोठ्या रावकीच्या गोष्टी ऐकल्या म्हणून जीभ सैल झाली वाटतं तुमची? आम्हीं आडमराठे! आम्हीं हुजरे! आम्ही कम अस्सल, आणि तुम्हीं कुठल्या निमक हराम मराठ्याचे वंशज?

**हणमंत** :—आम्हांला निमकहराम म्हणतांना दांतखीळ बसेल तुझी! आमचं हाड जातीवंताचं आहे!

**यमुना** :—खऱ्या मराठ्याचं रक्त आहे बरं—खऱ्या मराठ्याचं!

**संभाजी** :—पण त्याला तरी काय पुरावा आहे? आजच्या या जगांत कोण कुणाच्या शीलाबद्दल नि कुळाबद्दल खात्री देऊं शकेल? नांवावरून जात ओळखण्याची कुणाची प्राज्ञा आहे आज? वडिलोपार्जीत चालत आलेलं आपलं नांव बदलून, मराठशाहीच्या इतिहासांत गाजलेल्या एखाद्या शूर मराठ्याच्या नांवावर जगण्याचीच बहुजन समाजातील कांहीं लोकांची मनोवृत्ति आज फोफावत आहे! हें फुकटचें मोठेपण कशाला? तुम्हींच तेवढे मोठे खानदानी–अस्सल मराठे! या तुमच्या विधानाला काय पुरावा आहे? ज्ञानाच्या अभावी रानांत मेंढरं चारणारा धनगर सुद्धां स्वतःला राजाच समजतो. कारण मेंढरं राखण्यापलिकडं त्याला जगाचं ज्ञान असतंच कुठं?

**साबाजी** :—हणमंतराव, हा असला खुळा वाद घालण्यात कांहीं अर्थ आहे का? अहो, सध्या कुठं राहील्या आहेत जाती पाती! माणूसकीला पायदळी तुडवणाऱ्या, ज्या अनेक रुढी आमच्या समाजात आहेत त्यापैकींच ही एक जातीयवादाची. शहाण्या माणसानं स्वतःलाच उच्च समजून दुसऱ्याला नीच–हीन कधींहि समजूं नये. कारण प्रत्येकाला आपल्या शीलाबद्दल आणि कुळाबद्दल अभिमान हा असतोच.

**यमुना** :—हे तरी बरेच दिसताहेत? स्वतःच्या भावाला दोन गोष्टी न सांगता आम्हांलाच उपदेश करताहेत? भोळे म्हणता–म्हणतां बरेच दिसता कीं?

**संभाजी** :—हणमंतराव, या आपल्या बायकोला आवरा. स्वतः मोठे खानदानी शहाणे समजतां, आणि वादविवाद करायची आंगात ताकद नाहीं म्हणून बायकांना बरोबर घेऊन येतां?

**यमुना** :—हो, हो! मी आले! माझ्या नवऱ्याबरोबर मी आले! त्यांत तुमचं काहीं खर्च होत नाहीं बरं!

**संभाजी** :—मराठ्यांच्या बायकांनी इतका ताल सोडलेला, मी अद्याप पाहिला नाहीं कुठं!

**यमुना** :—आमचा तालबील काढूं नका हो तुम्हीं! तुमच्या बापाचं काहीं खात नाहीं आम्हीं समजलं?

**संभाजी** :—बाप काढाल तर थाप मारून घराबाहेर घालवीन.

**हणमंत** :—संभ्या—विचार करून बोल! ह्या हणमंतरावाशीं गांठ आहे. केव्हां दात पाडीन ते समजायचे नाहींत.

**साबाजी** :—हणमतराव, मी तुम्हाला हात जोडतो. पण तुम्ही या घडीला जा पाहूं!

**यमुना** :—या - या - भूरंड्याला पाहून पळून जाऊ कीं काय आम्हीं?

**हणमंत** :—काय मारणार आहे तो आम्हाला?

**यमुना** :—चोरी ती चोरी नि वरही शिरजोरी!

**हणमंत** :—या हणमंताच्या वाटेला जाणाराची तंगडी तोडली जाईल हें ध्यानात ठेव.

**संभाजी** :—(ओरडून संतापानें) हणमंतराव, आतां मुकाट्यानें जा—

**यमुना** :—काय मेला ओरडतोय राक्षसा सारखा—

**संभाजी** :—काय? मेला! मी मेला काय? हणमंत्या—

(संभाजी रागानें हणमंतरावाच्या अंगावर धाऊन जातो. साबाजीराव त्याला अडवतात. यमुना हणमंतरावाना ओढीत घराबाहेर घेऊन जाते,)

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

( स्थळ :—गांवा बाहेरील जंगल. जानू मेंढरें राखीत असतो. तो आपल्या सौंगडयानां व मेंढरानां उद्देशून हाका मारीत असतो. )

**जानू** :—हर्रर्र र्र-ये ! येऽऽऽऽ ! येऽऽऽऽ ! ये-ये-ये !! तिर-तिर-तीर ! वादा भरला ह्या शेळीवर, तीर्—मागं फीर—!! ए धोंडीबा, धोंडिबा रे हय् ऽऽऽऽ !! आरं तिकडनं फिरव. खालच्या दरडान जावंदेत पयलीकडच्या व्हाळयेन जावंदेत-र-हो ! मी वायच ह्या झाडाखाली सावळीला बसताय र गडयानू ! वादा भरला ही शेरडांची जात लय द्वाड ! पिरतूमीस परदक्षिना घालायस हवी ह्यांचे मागनं ! हरे रामा—रामा—रा शिवा गोवींदा !! जीव अगदीं टेकीस आला !

( जानू झाडाखाली बसतो. इतक्यांत सोनी गडबडीनें येते )

**सोनी** :—बाय बाय, बाय बाय ! हद झाली ह्या सोंगापुढं ! अवो, अजून तुमी रानांतच ?

**जानू** :—रानांतच ? मग काय करूं ? ती—बग ती—बग ! वादा भरला त्या शेरडांवरता, फिरतायत् काय माग ? बग, जीव अगदीं बेजार करतात.

**सोनी** :—तें माज सांगू नको तुमी ?

**जानू** :—मग काय सांगू ?

**सोनी** :—म्हनं काय सांगूं ? अवो, सेरडांसारखी पोरं झाली तुमाला.

**जानू** :—मला ? आणि तुला ?

**सोनी** :—इश ! मेला चावटपना किती बोलायचा ! अवो, तुमाला नि मला ! पन त्यासनीं खाया काय घालूं, झाडांचा पाला ? तुमी ही असी अकंड दिस सेरडं राकीत बसलाव व पैरेपन करायचं कुनी ? आनि त्या पोरांच प्वाट जलायचं तरी कसं ?

**जानू** :—एकदां लय मोठा दुष्काळ पडला व्हता ! आमच्या पंजाचे यळस. तवां म्हणतात मानसं पाला खावन जगली !

**सोनी** :— आतां तुमास मातर पाला वाटून घालायची पाळी आली. अवो, तुमच्या पंजाचे यळस मानसं जनावरं होती आसतील.

**जानू** :—सोने, सोने–जीभ आवर! अग त्या मानसांची कशाला बात? लात मारून पानी पाडनारी नि मातीचं सोनं करनारी ती मानसं कुटं नि आमी मानसं कुट?

**सोनी** :—त्या आज्यापंज्याच्या गोष्टी माज नको हायत. आज सांजच्या वक्ताचं काय? पोराच्या पुळ्यात सकाळधरनं भाकरीचा एक तुकडा बी नाय. सारकी टीरटीर करतायत मेली! त्यांच्या फुळ्यात घालूं काय मी आपलं काळीज? पोरास्नी काय सांगून समाजतांय? मोठ्याच्या पोटांत कावळं कोकटलं कीं, त्यांचं डोसकं उसाळतं! मग पोरास्नी तरी काय देयाचा बोला?

**जानू** :—मग काय करूं आता? चोरी करूं कुनाची?

**सोनी** :—काय बाय तरी इचीतरच ध्यान! अवो, चोरी करायस सागते काय मी? असलं हलकट काम सागाया मी काय हलकट हाय व्हय? हीच माजी पारक ना तुमास? फुकट गे बाय फुकट! इतकी वर्स माजेबराबर संसार केलाव पन फुकट!

**जानू** :—अग मंग करायचं काय?

**सोनी** :—आता एक करा. तुमच्या त्या गांवक्या थोड दिस ठेवा वाजूस. गावक्या करून काय प्वाट जळायच नाय! सुदारना बिदारनां जळूं देत त्या समद्या. आदी पोटाची सुदारनां करा!

**जानू** :—मग काय करूं तरी काय म्हनत्यायस?

**सोनी** :—ती सेरडं न्हेवन भरा साटांत नि चला माजेबराबर पैरेपनास. दोन रुपाय मिळालं तं सांज शेरभर दानं तरी मिळतील. चार भाकरीचं धोमं पोरांच्या फुळ्यांत टाकलं त व्हयल त्यांच्या आगीची शांती! पुरानं सांगून सबा आयकून नि भटाबामनांच्या पंक्तिस बसून काय हाय काय फायदा?

**जानू** :—अग, तुज बायकोस काय ठावं हाय सोने! आमच्या बाजीराव भाऊंच पलान लय डोचक्यांच हाय. पर करावं काय? आमचं घोडं हें असं पेंड खातं ना!

**सोनी** :—अवो पन आतां तुमीच सांगा? पोरांस्नी यळवर घांस मिळना, अंगावर फाटकं चिरगूट मिळना! एकादं पॉर तापानं फडफडलं तर एका

पैशाची सुंटीची कांडी आनायस आमास ऐपत नाय नि मोठ्या रावनाच्या गोष्टी बोलून काय करायच्या हायत ?

**जानूः**— अग पन हें आमचं जलमाचंच दळीदार हाय ! हें घालवायसाटीच नां सगळ व्हतांय ?

**सोनीः**— व्हतांय — व्हतांय ! चांगल तळपाट व्हतांय ! सावकाराच्या दारांत जायन म्हणलं त वाट नाय. कुनाचं पैरेपान करीन म्हनावं तं हातातं तिन दमड्या ! कुनाचं शेत साऱ्यान करीन म्हनावं त सोय नाय ! कसं जगायचं गरीबान ? काय खायाचं त्यानं ? तुमच त मोटं कायद हंदा ऱ्हाल पुस्तकांत. सबा भरताव, याक्यांनं देताव, पर गरीबाच्या पोटाचा काय बंदोबस्त हाय काय त्यांत ?

**जानूः**— यडी र यडी ! अग सोने, त्या साटीं त हें समदं चाललांय. आता आपलं राजहाय-सवराज हाय! हीतं कोन कदी उपासी मरायचा नाय !

**सोनीः**— पन सांजची वाट काय ?

**जानूः**— धीर धर, धीर धर, धीर धर-असी उतावळी होवं नकोस ?

**सोनीः**— उतावळी होवं नको ? मग सांज त्या पोरांच्या पुढ्यांत काय डोकं आपटूं कीं मान कापून घेवं ? त्यानां जलमास घातली म्हनू त्यानां उपासी मारून टाकूं ? काय करूं तरी काय ?

**जानूः**— शांत हो ! शांत हो ! !

**सोनीः**— शांत हो ! तुम्हांला सांगायला काय ! माज्या पोटचं गोळं हायत त. तुमास्नी काय ? आयसीचं काळीज हाय बरं माजं. बापांच ऱ्हवं-आयचं ?

**जानू**ः—सोने, सोने-किती टाकून बोललीस ग ? आतां काय करावं बरं ?

**सोनी**ः—आतां ती सेरडं साटांत ऱ्हेवन भरा आनि त्या–त्या सेतांत कामास या. तोवर मी जाते फुढं. ( जाते )

[ सोनी गेल्यावर जानू पुन्हां एक हांक घालून शेरडं अवळपासच असल्याची खात्री करून घेतो व गांठीचा तंबाकु तोंडांत टाकीत खालील लावणी गुणगुणतो.]


प्रभात
लालबाग

माज्या व्हटांन डाळींब पिकलं,
माज्या खोप्यांन फूल बाय कसलं
या वो सरदार सुवास घ्याया,
माज्या जीवाचे तुमी वो राया !

[ जानू लावणीच्या रंगात अगदीं गुंग असतो इतक्यांत बाजीराव येतो. ]

**बाजीराव** :—काय जानोबा ! हंसा कोल्हाटणीच्या लावणींत अगदीं गुंग होऊन गेलांत ?

**जानू** :—बाजीराव भाऊ, त्या हंसा कोलाटनीचा रंगढंग काय न्याराच हाय ! अवो, माज्यासारक्या पिकल्या पानाच्या मनातनं पन तिची ती लकब जायत नाय.

**बाजीराव** :—एकंदरीत तुम्हांला तमाशाचा नाद फार होता म्हणायचा ?

**जानू** :—नाद ? अवो, बाजीराव भाऊ, तुमास्नी आता ह्या सार्वजनीक कामाचा नाद हायना, त्या पक्षी. अवो, ह्या तमाशासाठीं म्हयना म्हयना सारकी जागरानं केल्यायत मी. आनि इतक्या गमती बगतल्यायत म्हनू सागू कीं काय इचारू नक्का. भलं भलं यडं झालायत् हो ह्या तमाशा पाय ! बसा. एक गम्मत सागतो तुमास्नी. ( बाजीराव बसतो. ) गेल्या धा वर्साचे पयली गजाल एक आला व्हता देशी तमाशा. त्यानं आमच्या गावात तमाशा करायचा ठरवलानं. तवा तुमी व्हताव मुंबयस. तवा काय गम्मत झाली, पारभररातीं तमाशा देवळाच्या माडावर उभा -हाला डफाची थाप. घडशीची लकेर. तुनतुन्याचं टँव टँव टँव टँव, चकऱ्याचं चिनाक चिनाक् चिनाक् चिनाक्, नि सणयचा सुर लागल्याबराबर झाडून सारं गावकरी देवळाच्या माडावर लोटलं. गांवच्या पाटलापासनं सीमेच्या धनगरास धरून, म्हारपोर म्हातारं कोतारं अगदी एकमेकास खेटून बसलं.

**बाजीराव** :—काय सांगता काय जानोबा, खरं हें ?

**जानू** :—देवाचान बा ! आनि काय सांगू गम्मत तुमास ! तो तमाशा व्हता देशी म्हाराचा, पर आमच्या गावकऱ्यासनी वाटलां तो बामनाचाच हाय. ते बिचारे तमासगिर सागत व्हते हो, आम्ही म्हार म्हनून. पर आमचं गावकार इतकं फिदा झालं व्हत, ते त्यासनी म्हार म्हनायस तयारच व्हयतनांत.

**बाजीराव** :—अरे वा ! झटकन अस्पृश्यता नष्ट करीत होते म्हणायचे.

**जानू** :—आनि फुडं तरी ऐका. तुमचं दादा, हणमंतराव, मारे चवल्या पावल्या उडवतां उडवतां इतक बेहोस झालं नि त्यानीं आपल्या हातातलं चार तोळ्याचं सोन्याचं सैलकडं दौलतजादा कराया त्या नाच्या पोऱ्याच्या हातातं देलं. मग काय इचारताव राव, इरुद पारटी चीत!

**बाजीराव** :—आमच्या अण्णानी आपलं सोन्याचं कडं दौलतजादा करायला दिलं?

**जानोबा** :—होय-होय, होय. तुमच्या अन्नानीं! बाजीराव भाऊ तुमी कमी समजू नका त्यासनीं. अवो, ता सुभान पाटील तुमास्नीं ठावा हायनां? अवो, त्यानं तर त्या नाच्या पोऱ्यास मिटीच मारलान. त्यास वाटलं कोलाटील हाय. (हंसतो) पर सगळं ब्याड फुटलं नि असा खटावला हाय म्हनताव काय इचारूं नक्का.

**बाजीराव** :— पण ते तमासगिर महार असतानां त्या वेळीं हे मराठे बामण त्यानां शिवत कसे?

**जानू** :—निसतं शिवतच न्हवतं, त नाच्या पोऱ्यास आपल्या चुलीजवळ न्हेवन जेवायस सुदां वाडीत.

**बाजीराव** :—शाब्बास! पहा, पहा किती ढोंगीं लोक हे? महाराची सावली पडली तर आंघोळ करणारे हे लोक तमाशा चालला असतांना मात्र महाराच्या मुलाला कडकडून भेटायला तयार असतात, आणि इतर दिवशीं त्यांच्या सावलीलासुद्धां हे अपवित्र मानतात. काय ही ढोंगी वृत्ती!

**जानू** :—अवो, त्या तमासगीरानां तुमच्या अण्णानींच आपल्या घरांत ऱ्हायाला जागा देली व्हती.

**बाजीराव** :—आणि आतां, कायद्यानं सुद्धां अस्पृश्यता नष्ट होऊन किती तरी दिवस झाले तरी जानोबा, तुम्हांला आमच्या खळ्याच्या बाहेरच उभं रहावं लागतं! काय म्हणावं आमच्या या समाजाच्या मनोवृत्तीला!

**जानू** :—चालायचंच! सत्तेफुडं कुनाचं शानपान हाय भाऊ! कसं झालं तरी तुमचं अण्णा आज त्या गावांत कर्तं हायत.

**बाजीराव** :—म्हणूनच मी म्हणतो, या कर्त्या माणसानीं आपला समाज सुधारायला नको का? फुकटची प्रतिष्ठा गाऊन काय उपयोग?

**जानू** :—बाजीराव भाऊ, तुमच्या शानपनाचं एक एक ब्वाल आयकलं मजे माज किती गोड वाटतं म्हनू सांगू? अगदीं आबाळावडा आनंद व्हतो माज! आणि कवां कवां आचिरय बी वाटतां!

**बाजीराव** :—आश्चर्य! तें कां बुवा?

**जानू** :—अवो, असं बगा, कसे झालो तरी आमी म्हार लोक, तुमचं चाकर आमी. आमास्नी तुमां मराठ्या-बामनावानी वागून चालल व्हय? पर तुमी तर आमांस त्यंचे फुडच पर करायस सागतांव. आमच्या बापज्याद्यानं कदी केलान नाय, तां आता आमास करायस बी लय जड पडतां. भाऊ, खरंच तुमी अगदीं देवा परमान वाटतांव आमां लोकास्नी. आमचेसाठीं किती तरास पडतोय तुमास!

**बाजीराव**:— छे, छे छे! जानोबा मी तुमच्यासाठीं कांहींच करीत नाहीं. आमच्या आदर्श पुढाऱ्यानी जे मार्ग आम्हांला दाखऊन दिले आहेत त्या मार्गानंच आम्हीं चाललों आहोत. ग्रामसुधारणा हेंच आमच्या पूज्य महात्माजींचं ध्येय होतं खेड्यांत चला म्हणून भारतियानां त्यानीं हांक दिली होती. आणि जी अस्पृश्यता नष्ट झाली आहे ती गाधीच्या महान प्रयत्नामुळेंच. या गोष्टींचे कायदे झाले आहेत खरे, पण त्यांचा खेडोपाडीं प्रचार करून ते अमलांत आणण्यासाठीं झटणें हे माझ्यासारख्या सामान्य देशसेवकांचे पहिलें कर्तव्य आहे. जगातील लोक सुधारणेच्या शिखरावर चढले म्हणून त्यांचा हेवा न करितां आपणहि त्यांच्याप्रमाणें सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आकुंचित अडाणी वृत्तिचा माजलेला हा सुळसुळाट, ज्यावेळीं भारताच्या खेडवळ जनतेतून नाहींसा होईल, आपली माणूसकी, आपलें कर्तव्य, आपला नेता, आणि आपले राज्य ओळखण्याची पात्रता ज्या वेळीं आपल्या खेडवळ बहुजनसमाजांत येईल त्याच वेळीं आमच्या भारतदेशाचा मंगलध्वज जगाच्या रंगभूमिवर मोठ्या डौलानें चमकेल! बराय जानोबा, तुमची शेरडं बरीच लांब गेलेली दिसतात. जा तुम्हीं आतां, पुन्हां बोलूं केव्हां तरी. अलीकडं लांडगे फार बोकळले आहेत या बाजूला. उगीच एखादा गरीब कोंकराचा प्राण जायचा!

**जानू** :—वादा भरला ही शेरडाची जात लय वायट. वाऱ्यासारकी पळतात कोल्यान धरलान त्यासनीं! जुवार सायब! जातो आदी.

( जानू घाईघाईनें निघून जातो. दुसऱ्या बाजूनें संभाजी विचार करीत येत असतो. आपल्या समोर वाटेंत बाजीराव उभा आहे हें सुद्धां त्याला दिसत नाहीं. त्याला जवळ असलेला पहातांच बाजीराव जोरानें शिंकतो. संभाजी एकदम दचकतो बाजीराव मोठमोठ्यानें हसतो. )

**बाजीराव** :—अरे लेका पुढे पाहून तरी चाल ! असा अंगावर घुसतोस काय डुकरासारखा ? आणि कायरे, त्या दिवशीं आमच्या अण्णांना तू म्हणे दमदाटी केलीस ?

**संभाजी** :—बाजीराव, ती सगळी हकिगत त्या दिवशींच मी तुला सांगितली नाहीं का ?

**बाजीराव** :—सांगितलीस रे ! पण मला वाटलं, झालं असेल आपलं मामुली भांडण ! पण त्या दिवसानंतर आमच्या अण्णानीं आणि वहिनीनं जो काहीं अवतार धारण केला आहे तो काहीं विचारूं नकोस. सुशीलेवर डोळ्यांत तेल घालून पहारा आहे त्या दोघाचा. आणि मला तर सारखा पाण्यातच पहात आहेत. सुशीलेची आणि माझी अशी कुचंबणा झाली आहे कीं सागता सोय नाहीं ! सुशीला तर अगदी सुकल्या कळीसारखी पार कोमेजून गेली आहे !

**संभाजी** :— बाजीराव, एकंदर घडली घटना ती काहीं योग्य घडली नाहीं ! काय करावं !

**बाजीराव** :—अरे पण, आतां झाल्या गोष्टीचा विचार करण्यांत काय अर्थ आहे ? मात्र एवढं खरं कीं, सुशीलेची मैत्री यापुढं तूं सोडली पाहिजे.

**संभाजी** :—बाजीराव, असं झालं तर माझ्या जिवांत मुळीं जीवच राहणार नाहीं ! बाजीराव, आतां तूंच सांग, या पुढं मी काय करावं ?

**बाजीराव** :—सुशीलेचा नाद अजिबात सोडावा.

**संभाजी** :— बाजीराव, तूंच का रे सांगतोस हें ? मग आतां मात्र पूर्ण निराशाच पदरीं पडणार !

**बाजीराव** :—शाबास ! म्हणजे एका प्रेम प्रकरणांत तूं फसलास तर इतका निराश होतोस, मग अनेक वेळां प्रेमभंग झालेल्या आणि दहावीस मुलींनीं प्रेम पत्रें पाठवून, दिनरात्र आठवून नि हृदयांत साठवून ठेवलेल्या तरुण तरुणींचा प्रेमभंग होतो, तरी त्याची आशा कायम जागृत असते. पण त्याला अपवाद मात्र आहे हं ! कदाचित एखादी अथवा एखादा, आगगाडीच्या रुळावर मान

ठेवून कोणीतरी पहावं म्हणून वाट पहात [redacted]ऱ्यांचं नशीब असलं ताठ तर गाडी येते लागोपाठ ! नाहींतर मग पडते पोलीसाशीं गांठ आणि लागते जन्माची वाट ! तेव्हां काय म्हणतो मी ? असा प्रेमवेडा होऊं नकोस. अरे ही सुशी नाहीं मिळाली तर दुसरी कुशी तर मिळेल ?

**संभाजी** :—बाजीराव, थट्टा करूं नकोस. खरंच सांगतो बाजीराव, मी अगदीं खरोखर निराश झालोय रे ! मला आतां दुसरं कांहीं सुचत नाहीं.

**बाजीराव** :—छे, छे ! असं काय म्हणतोस ?

फुका धरिसी ही मनीं निराशा ।
लावूनि जीवि या प्रेमपाशा ॥ धृ० ॥
हृदयिं धरूनी अमर आशा ।
मनुजा चिंती कधीं न विनाशा ।
निश्चय दृढ धरीं हीच मनीषा ॥ १ ॥

असा निराश होऊं नकोस. निराशा म्हणजे आयुष्याच्या वाटेवरचा लाल दिवा ! तो लवकर मालवून आयुष्याची गाडी जीवनरुपी रुळावरून पुढं नेण्यासाठीं झटपट प्रयत्न केला पाहिजे. निराशा फार वाईट बुवा ! निराशा पदरीं बाळगणारा माणूस उभ्या जन्मात कधीं सुखी होणार नाहीं.

**संभाजी** :—निराशेचा काळाकुट्ट अंधार पुढं दिसत असतांना, खोटी आशा हृदयीं बाळगून तरी काय उपयोग ?

**बाजीराव** :—संभाजी, निराशेंतूनच आशा जन्माला येते. आणि माणूस नेहमीं निराशेवरच जगतो. इतकंच नव्हे तर एकादं भयंकर दिव्य करायला सुद्धां तो तयार होतो.

**संभाजी** :—सांग, बाजीराव सांग ! मी कोणतं दिव्य करूं सांग ? सुशीलेसाठीं तूं सांगशील तें करायला मी तयार आहे.

**बाजीराव** :—थांब, थांब ! असा प्रेमवेडा नव्हे—बाईलवेडा होऊं नकोस. इंग्लंडच्या राजाची नक्कल करायच्या भानगडींत पडूं नकोस. बायको मिळवण्यासाठीं दिव्य करण्याऐवजीं बायकोपासून चार पावलं दूर कसं रहावं हेंच मोठं दिव्य सध्यांच्या विवाहित गृहस्थांवर येऊन पडलं आहे ! कारण हिंदुस्थानची अफाट लोकोत्पत्ती. चीन देश सोडला तर या बाबतींत आमच्या हिंदुस्थानचाच

पहिला नंबर लागतो. एवढ्या कोट्यावधी प्रजेला पोसता पोसतां सरकारच्या अगदीं नाकी नऊ येतात! तेव्हां बाबानों, या बाबतींत तरी सरकारशीं सहकार्य करा!

**संभाजी** :—बाजीराव, माझ्या मनाची तुला पारखच नाहीं कारे? त्या शिवाय माझ्या जीवनमरणाच्या प्रश्नाला तूं असं थट्टेवारी नेलं नसतंस! सुशीला नि मी लहानपणापासून एकमेकावर प्रेम करतों, आणि आमच्या त्या निस्सीम प्रेमानें जर अशा तऱ्हेचा अडथळा निर्माण झाला तर या पुढचं जीवन जगणं मला अगदीं अशक्य होईल! म्हणून म्हणतो, बाजीराव. आतां तूंच काय तो माझ्या आशेचा अंकुर आहेस!

**बाजीराव** :—भल्या माणसा, असा अगदीं प्रेमभंग झालेल्या एखाद्या कॅालेज कुमारा सारखा काय बोलतोस? तूं शेतकरी गडी आहेस. बेगडी फॅशनच्या मागं आवंढे गिळीत फिरणारा एखादा फॅशनेबल सुधारक कुमार किंवा काव्याच्या फाजील लाडामुळं लाडावून वेडापिसा झालेला एखादा कवि नाहीस हें पूर्ण लक्षांत ठेव.

**संभाजी** :—मी शेतकरी-नांगऱ्या असलों, म्हणून मला हृदय नाहीं, मला भावना नाहींत, असं का तुला वाटतं? बाजीराव, तुला सगळं समजत असून सुद्धां तूं मुद्दाम हें डोळ्यावर पांघरुण घेतो आहेस. माझ्या केविलवाण्या स्थितीचा मुळींच विचार न करितां माझी सारखी थट्टा करतोस? बाजीराव, मला खरोखर कांहीं सुचत नाहीं रे!

**बाजीराव** :—सारखी डोळ्यापुढं सुशीला दिसते नाहीं! अरे मर्दा, साऱ्या गांवांतून छाती पुढं काढून मर्दमराठ्यासारखा रस्त्यानं ऐटबाज चालीनं चालणारा, कोणत्याही लहानमोठ्या कामाकडं कर्दनकाळाच्या दृष्टीनं पहाणारा तूं, घारीला पाहून जाळींत लपणाऱ्या सशासारखा कसा झालास हेंच मला कळत नाहीं. मनुष्य तारुण्यात आला कीं त्याला एक प्रकारचं वेड लागतं हेंच खरं.

**संभाजी** :—बाजीराव, मघापासून मी तुला मोठ्या जिव्हाळ्यानं माझ्या अंतरीच्या वेदना सांगत असतांना, तूं त्याबद्दल मला आश्वासून सहानुभूतिपूर्वक कांहीं एक न सांगता, एखाद्या नाटकातल्या पात्राप्रमाणं आपलंच घोडं पुढं दामटून माझ्या भाषणाची उपेक्षा करतो आहेस.

**बाजीराव** :—छे, छे ! तसं मुळींच नाहीं. भलताच गैरसमज करून घेऊं नकोस. अरे नाटक झालं तरी तें एखाद्यान्या जीवनाचं चरित्रच असतं ना ? निव्वळ कल्पनेवरच नाटककाराला जगता येत नाहीं. वास्तवतेला धरून नाटककार जी नाटकें निर्माण करतो तीच जगांत जास्त काळ जगूं शकतात. कल्पनेचा खेळ हा तात्पुरता असतो. तात्पर्य काय कीं, नाटक झालं तरी तें निव्वळ नाटक आहे असंच समजूं नये. त्यांत समाजाचे गुण दोष दाखवून लोककल्याणासाठीं सत्य मार्गदर्शन करणं हा नाटककाराचा मुख्य हेतू असतो.

**संभाजी** :—झाल ? तूं तुझं तेंच घेऊन बसशील ! माझ्या सांगण्याकडं दुर्लक्ष करून तूं भलतेच विषय काढूं नकोस बुवा ! कारणाशिवाय चर्चा करणं आपल्याला नाहीं आवडत.

**बाजीराव** :—पहा, माणूस किती स्वार्थी असतो तें पहा. स्वतःच्या सुख-दुःखापलिकडे दुनियेंतील बऱ्या वाईट गोष्टीकडे तो चुकूनसुद्धां पहात नाहीं. स्वतःचा स्वार्थ साधला कीं, इतरांची त्याला पर्वा नाही. आतां तुझ्याच म्हणण्याप्रमाणं बोलायचं तर मी असं म्हणतो, तुमच्या तरी या प्रेमप्रकरणांत आणि अण्णान्या भांडणांत विनाकारण मध्यें पडायची मला काय जरूर आहे ? ती तिकडं सुशीला आहे, हा इकडं तूं आहेस ! अण्णा आहेत, आमच्या वहिनी आहेत. शिवाय तुझे दादा आहेत. एवढी मोठी, बडी बडी मंडळी असतांना माझं रे काय काम तिथं ? विनाकारण मधेंच लुडबुड करणं आपल्याला नाहीं बुवा पसंत !

**संभाजी** :—बाजीराव, ज्या आशेनें मी आतांपर्यंत तुझ्याकडं पहात आलो त्या आशेचा, अशा तऱ्हेनं बोलून तूं चुराडा करणार का रे ?

**बाजीराव** :—हा काय बुवा भलताच चमत्कार ? अरे, पण असल्या फाजील आशेनं तूं माझ्याकडं काय म्हणून पहातोस ? मी का कुणी घरचा कर्ता आहे ? सुशी-लेवर माझा हक्क आहे का ? आज आमच्या घराचे मालक अण्णा आहेत. त्यांन्या इच्छेप्रमाणं ते सर्व करणार ! त्यांच्या मनांत सुशीला जर तुला द्यायची नाहीं, तर मी तरी काय करणार बुवा ! हां ! आतां मी त्यांना एवढं सांगू शकेन, कीं संभाजी माझा दोस्त आहे. प्रामाणिक आहे ! हुशार आहे ! आपल्या बायकोचा संसार करायला अगदीं लायक आहे. एवढी हमी मी देऊं शकेन, आणि त्या दिवशीं दिली सुद्धां ! पण अण्णांच्या पुढं माझं बोलणं म्हणजे बहिऱ्यापुढं पोथी

वाचणं. एक प्रकारची निष्फळ बडबड ! तेव्हां आतां तूंच सांग, या बाबतींत मी अधिक काय करूं शकणार ?

**संभाजी** :—तूं मनांत आणशील तर अण्णांचं मन वळवूं शकशील.

**बाजीराव** :—शाबास ! म्हणजे मला आपलें आजच घरदार सोडून कुठं तरी पर्णकुटी गाठावी लागेल. म्हणजे बहिणीच्या प्रेमसाफल्यासाठीं भावावर वनवास भोगायची पाळी यायची ! अतां खरं म्हटलं तर तूं तसं करायला हवं होतंस. सुभद्रेसाठीं अर्जुनानं नाहीं का त्रिदंड संन्यास घेतला ?

**संभाजी** :—पण कृष्णाचाच तो सल्ला ! म्हणून अर्जून त्यांतून निभावला ! बाजीराव, तूं करतोस का कृष्णाच काम ?

**बाजीराव** :— छे बुवा ! कृष्णाचं काम करायचं म्हणजे आंगाला काळा रंग फासायचा ! शिवाय हजार दगदगी ! इतकंहि करून शेवटीं नांव नाहींच ! कृष्णकारस्थान म्हणून लोकांनी नाकं मुरडायची ! माझ्या सारख्या गोऱ्या माणसानं असलीं कृष्णकृत्यं करून उगीच काळेपणा आंगाला कां लावून घ्या ! आपल्याला नाहीं जमायचं बुवा !

**संभाजी** :—ठिक आहे ! माणूस आशेवर जगतो–आशेवर जगतो म्हणून ओरडून सांगणाऱ्या माणसानं, स्वतःच्या हातानं दुसऱ्याच्या आशेचा चोळामोळा करून टाकल्यानंतर, त्या अभागी जिवाच्या पदरीं दारुण निराशेशिवाय दुसरं काय पडणार ? बस्स ! आतां एक निराशा ! माफ कर बाजीराव ! काय सांगू तुला ! मला फार आशा होती. पण आतां–आतां काय बोलूं ? जातो मी—

**बाजीराव** :—अरे हो ! मलासुद्धां लौकर गेलं पाहिजे. लोक वाट पहात असतील.

[ दोघे दोन दिशेला जातात ]

☆

# प्रवेश २ रा

[ स्थळः— हणमंतरावाचे घर. यमुना व सुशीला. ]

**यमुना** :— वन्सं, इतके दिवस झाले तुम्हीं आपला हट्ट सोडीन नाहींत. ना काम ना धाम ! बरं, राहायचं तें तरी आनंदात ? सारखा आपला एखाद्या वेडीसारखा विचार करीत असतां, अशानं आम्हीं समजायचं तरी काय बाई ! अजून काहीं तुमचं लग्नाचं वय गेलं नाहीं. आणि आम्हांला तुमची काळजी नाहीं अस कां वाटत तुम्हांला ?

**सुशीला** :— छे छे ! वहिनी, माझ्याबद्दल केवढी काळजी तुम्हांला ! माझ्या हितासाठीं अगदीं अहोरात्र झटत असता तुम्हीं !

**यमुना** :— मग खोटं आहे कीं काय ? तुमचं कल्याण व्हावं, तुम्हांला चांगल स्थळ मिळावं नि तुमचं आयुष्य सुखांत जावं यासाठींच ना आम्हीं झटतों !

**सुशीला** :— पण त्यामुळं माझ्या आशेचा मनोरा ढासळला याची काय वाट ? वहिनी, 'आजच्या' मुलींची मनं तुम्हाला कशी ग कळत नाहींत ?

**यमुना** :— आम्हाला सगळं कळतंय. आतां तुम्हीं लग्नाच्या झालात तुमचं लग्न लौकर केलं पाहिजे हें चांगल कळतंय बरं आम्हांला ! आणि त्यासाठीं इकडच्या जिवाची धडपड चालली आहे ! पण आपल्याच तोलाचं स्थळ नको का मिळायला ! आमचं घराणं काय असं तसं आहे कीं आपली मुलगी उजवायची नि कुणाच्या तरी स्वाधीन करायची ? त्या बेमुर्वत साबाजीरावाला नि त्या संभाजीला कांहीं वाटायला हवं होत आमच्या मुलीला मागणी घालायला !

**सुशीला** :—वहिनी, तूं उठल्या सुटल्या संभाजीरावांना वाईट बोलतेस हें मला नाहीं आवडत. मी तुला पुन्हा सांगते संभाजीरावांवर माझं प्रेम आहे. मी त्यांच्याबरोबरच लग्न करणार !

**यमुना** :- हा वेडाचा झटका अजून आहे का तुमच्या डोक्यांत ? आतां बाई उपायच हरला !

**सुशीला** :—वहिनी, नकोग माझा असा छळवाद मांडू ! त्यांच्याशिवाय माझं जीणं प्राणाशिवाय कुडी ! वहिनी, ईश्वरसाक्षीनं एकमेकांशीं बद्धमूल झालेले जीव काळाच्या जबड्याशिवाय कोणीहि तोडूं शकत नाहीं. वहिनी, माझं निःसीम प्रेम जरी तुला कळत नसलं तरी तूं अण्णांना ज्या दृष्टीनं पहातेस, त्याच दृष्टीनं

मी संभाजीरावांना पाहाते आहे. मग वहिनी, आतां तूच सांग, अण्णांना जर कोणी वेडंवाकडं बोललं तर तें तुला सहन होईल का? नाहीं ना? मग संभाजीरावांना जर कोणी तसं बोललं तर तें मला कसं बर सहन होईल!

**यमुना** :—बाई बाई बाई! आतां शर्थच झाली बाई! एखाद्या परपुरुषाला लग्नाआधिं स्वतःच्या पतिसमान मानायचं, आणि काय तें मेलं प्रेम कीं काय तें करायचं ही काय वेगळीच तऱ्हा बाई! वन्सं? फारच हुशार झालांत हो तुम्ही! मला बाई मोठं नवल वाटतं तुमचं! आमच्या बापजन्मीं आम्ही हें असलं कौतुक कधीं पाहिलं नाहीं कीं ऐकलं नाहीं! आतां बाई जगच उलट झालं! ऐकलंत का? मेहरबानी करा नि त्यांच्या तोंडावर तरी असं बोलू नका.

**सुशीला** :—वहिनी, इतके दिवस वाट पाहिली पण अजून काहीं तुम्हांला माझी याद येत नाहीं! त्या दिवसापासून तुम्हीं मला अंधारकोठरींतील कैद्या-प्रमाणं डांबून ठेवली अहांत. माझ्या मनाची तिळभर सुद्धां कदर न करता तुम्हीं एखाद्या तुमच्या तोलाच्या पुरुषाबरोबर माझं लग्न लाऊन देण्याचा खटाटोप चालवला अहांत. पण वहिनी, एकाच्या चरणीं वाहिलेलं हृदय दुसऱ्याचं जीवन सुखी करूं शकेल का? खोट्या प्रतिष्ठेसाठीं प्रेमाला पायदळीं तुडवून, प्रेमी जीवांच्या जीविताची होळी करून, प्रेमाचा, आदराचा, लवलेशहि नसतांना, एखाद्याशीं जन्माचा संबंध जोडणं, म्हणजे त्या निर्मळ जिवाशीं प्रतारणा करण्यासारखंच नाहीं का? वहिनी, तूं जरी जुन्या मताची असलीस तरी स्त्रीच आहेस. स्त्रीचं हृदय स्त्रीलाच कळतं! वहिनी, खरोखर सांगते ग! खरोखर तुम्हीं माझं लग्न संभाजीरावाशींच करा! वहिनी, मी तुझी बहिण आहे असं समज! मला अशा निष्ठुरतेनं नको ग वागवूंस! खरंच वहिनी, तूं अण्णांना समजावलंस तर ते खात्रीनं ऐकतील तुझं!

**यमुना** :—छे ग बाई! आपल्याऱ्यानं नाहीं हो व्हायचं काहीं! हें जगा-निराळं मेलं सांगायचं तरी कसं त्यांना? आणि त्या साबाजीरावाच्या घराण्यांत तर प्राण गेला तरी आमची मुलगी द्यायची नाहीं. त्याची आमच्या पायाजवळ तरी बसायची लायकी आहे का? आणि त्या दिवशीं आपली योग्यता न ओळखतां त्यांनी आमचाच अपमान केला. इकडून अब्रुनुकसानीची फिर्यादच करायचं होणार होतं, पण मीच म्हटलं नको. छे ग बाई! असल्या धुंगुरड्याबरोबर सोहीर संबंध जुळवला तर जग आमच्या तोंडावर थुंकेल. वन्सं, हे फाजील

चाळे आतां सोडा. अशानं आमच्या घराण्याला डाग लागेल. आईबापांच नांव उजळ करगं हें मुलीचं कर्तव्य असतं.

**सुशीला** :—होय ना ? मग मुलीच्या इच्छेप्रमाणंच वागल्यान ती त्यांची इच्छा पूर्ण होईल. वहिनी, निव्वळ खानदानी घराण्यांत मुलगी दिल्यानं आईबापांचं नांव उजळ होतं असं थोडच आहे ? ज्याच्याबरोबर तिला संसार थाटायचा, त्याच्यावर जर तिचं प्रेम नाहीं तर त्या घराण्याला काय आग लावायची आहे ?

**यमुना** :—वन्सं, फार चढेलपणानं बोलूं लागलांत हं तुम्हीं ?

**सुशीला** :—मग काय करूं ! एखाद्या लिलावांतल्या वस्तूसारखी तुम्हीं माझी गत आरंभली अहांत ! मोठेपणा मोठेपणा ! ! कसला तुमचा मोठेपणा ? स्वतःला स्वतःनंच मोठं ठरवून दुसऱ्यांना हीन ठरवणं हा काय मोठेपणा झाला ? स्वतःच स्वतःची टिमकी वाजवल्यानं कांहीं मान मिळत नाहीं. तुम्हीं नवरा-बायको दोघंही अगदीं स्वार्थी अहांत !

**यमुना** :—घ्या ! ऐका हें ! आम्हीं स्वार्थी काय ? बोल बाई ! खुशाल बोल ! यांचाच स्वभाव मेला नेभळा ! जाईना का होती कुठं ती ? आपली पोरच नाहीं म्हटलं सोडून दिलं ? जगांत काय अशा थोड्या जातात !

**सुशीला** :—वहिनी, किती खुळेपणानं बोललीस हें तूं ? अग, मी का कुणाचा हात धरून जाते आहे ? चांगली लग्नासाठीं तुमची संमति मागते आहे ना ?

**यमुना** :— हात धरून जा, नाहीं तर कुठंही जा. घरीं येणं झालं की सांगते त्यानां, हें गाडं कांहीं तुम्हांला आवरायचं नाहीं. याला आपली सोड-चिठ्ठी द्या. ( रागानें निघून जाते ).

( यमुना गेल्यानंतर सुशीला क्षणभर सचिंत बसते. नंतर गाणं म्हणते )

**सुशीला** :—

लागला घोर माझिया जीवा ।
शांती ना तयास चैन नच पहा ॥
ना मज माता, ना पिता । सांगू कुणाला माझी कुळकथा ।
संकट आलें हें आज महा ।
दाटला घोर ऽ ऽ घोर अंधार हा ॥

( गाणें म्हणत असतांना तिच्या नयनांतून अश्रू घळघळ वहात असतात. गाणें संपताच शेजारीच असलेल्या खुर्चीवर ती डोळे मिटून सचिंत बसते. काहीं वेळानं बाजीराव येतो व तिला न्याहाळून पहातो व ती भानावर नाहीं असें पाहून तिला हांक मारतो. )

**बाजीराव :**—( टाळी वाजवून ) काय ताईसाहेब, काय समाधी लागली आहे कीं काय ? अगदीं डोळे मिटून स्वस्थ पडली होतीस तेव्हा म्हटलं कुणाचं नामस्मरण चाललंय कीं काय मनांतल्या मनांत ? अरे ! पण तूं अशी एकाद्या प्रदर्शनांतल्या बाहुलीसारखी नुसती पहातच काय राहिलीस ? बोल ना ! ( सुशीला पुन्हां डोळे मिटून घेते. तिच्या डोळ्यातून अश्रू वहात असतात ) ताई ? तुझ्या डोळ्यांत अश्रू ? अग खुळे, अशी रडतेस काय रडूबाईसारखी ! प्रसंगाला धैर्यानं तोंड द्यायचं सोडून मुळु मुळु रडत बसणं शोभत नाहीं तुझ्यासारख्या हुशार तरुण मुलीला.

**सुशीला :**—भाऊ, रडूं नको तर काय करूं ? तुम्हीं सर्वांनी माझा अगदीं छळवाद मांडला अहांत ! सुखानं मरूं सुद्धां देत नाहींत तुम्ही मला !

**बाजीराव :**—ताई, आतां मी तरी काय करूं ग ? अण्णाच्या नि वहिनीच्या पुढं माझं काहीं एक चालत नाहीं हे तूं स्वतः पहातेसच.

**सुशीला :**—सगळं पहातेय मी ! जगाच्या उलाढालीत मोठ्या हिरिरीनं भाग घेऊन लोककल्याणासाठीं झटणारा माझा भाऊ, स्वतःच्या बहिणीचं कल्याण मात्र करूं शकत नाहीं.

**बाजीराव :**—छे बुवा ! त्या बाबतींत काहीं आपली मति चालत नाहीं.

**सुशीला :**—खोटी आशा दाखवून नि अखेरीला फसवून नामानिराळं रहायची संवयच आहे तुला. मी खुळीनं खोटीच आशा हृदयीं बाळगली नि स्वतःची फसवणूक करून घेतली ! मला वाटत होतं, माझा भाऊ माझ्यासाठीं कांहीं तरी करील ! भाऊ, निराशेच्या आंधारांत तुझ्या प्रयत्नांचा काजवा, मला सूर्यप्रकाशासारखा भासत होता ! पण तोहि भास आभासच ठरावा ना ! मीच अभागी तिथं तूं तरी काय करणार ?

**बाजीराव :**—खरंच ! मी तरी काय करणार ? दैवाची लीला विचित्र आहे नि ईश्वराची करणी आगाध आहे ! जें होऊ नये तें होतं, जें व्हायला पाहिजे तें होत नाहीं ! आतां तुझंच पहा, संभाजीविरहीत दुसऱ्या एखाद्या

तरुणावर जर तुझं प्रेम बसतं तर अण्णानीं तुझ्या लग्नाला मुळींच हरकत घेतली नसती. पण संभाजी पडला साबाजीरावांचा भाऊ आणि तू पडलीस हणमंतरावांची बहिण. तेव्हां घोडं जे अडतं ते इथं.

**सुशीला** :—त्याची उजळणी नको आहे. मला सगळं ठाऊक आहे. तूं सुद्धां पक्का ढोंगी आहेस. वरून सुधारणेच्या गोष्टी बोलायच्या, जातीयवाद नष्ट करा म्हणून ओरडायचं नि स्वतःवर प्रसंग आल्यावर मात्र जातीसाठीं माती खायला तयार व्हायचं ! आणि म्हणे आम्हीं जनतेचे पुढारी ! आंधळी जनता तुमच्या-सारख्या ढोंगी पुढाऱ्याना डोकीवर घेऊन नाचवतेय तोपर्यंत कधींहि कल्याण होणार नाहीं.

**बाजीराव** :—शाबास ! टाळी घेण्यासारखं बोललीस ! आहे, अजून अंगात तडफ आहे ! पण काय ग ? माझ्यावरच ही एवढी तुझी दादागिरी कां ? अण्णाच्या समोर का बोलत नाहीस अशी ? मी आपला पडलो गरीब, म्हणून मलाच दमदाटी करतेस काय ? आश्चर्य आहे ! तूं गडबड घोटाळा करायचा, त्या-बद्दल अण्णानी तुला दम भरायचा, आणि तुला दम मिळाला म्हणून तूं त्याचा राग माझ्यावर काढायचा ! वा ! छान ! स्वतःचं हीत साधलं नाहीं कीं, चट् सारं जगच बदमाष आहे म्हणून ओरडायचं ! नि—दुसऱ्याच्या नावानं खडे फोडायचे ! मनुष्यस्वभावाचा काय नमूना आहे पहा ?

**सुशीला** :—लोकहीतासाठीं झटायचं व्रत धारण करणाऱ्या माणसानं असं क्षुल्लक कारणावरून रागवायचं नसतं !

**बाजीराव** :—कोण रागावलं ? मी ? छे छे ! मुळीच नाहीं. ताई, तूं मला शिव्या दिल्यास तरी सुद्धा मला राग यायचा नाहीं. हो केव्हा केव्हा, असं मात्र वाटतं कीं, माझ्या ताइन या प्रेमाच्या नि लग्नाच्या भानगडींत न पडता काहीं दिवस तरी देशाची सेवा करावी, ताई, तूं कंटाळशील माझं हें व्याख्यान ऐकून. पण खरं म्हणशील तर आज आमच्या ह्या खेडयातील निरक्षर स्त्रियांना साक्षर करण्यासाठीं, अडलेल्या बाळंतणींची मुक्तता करण्यासाटीं, आरोग्यशास्त्राचं महत्त्व पटविण्यासाठीं, आजाऱ्याची शुश्रुषा करण्यासाठीं, अशा एक ना दोन, हजारों अडचणीं आमच्या खेडयात 'आ' वासून उभ्या आहेत. त्यांतून गरीब शेतकरी स्त्रियांची मुक्तता करून, त्यांचा बुद्धिविकास करून, स्वातंत्र्याचं महत्व त्यानां पटवून-देण्यासाठीं, किती तरी स्त्रीसेविकांची जरूरी आहे. स्वतंत्र भारतांतील स्त्रियानीं आता स्वतःपुरतंच पाहून चूल आणि मूल संभाळूनच भागायच नाहीं. तर

सार्वजनिक कार्यांत उत्साहानं भाग घेऊन जनसेवेसाठीं आपुलकीनं झटलं पाहिजे, आणि त्यासाठीं स्वार्थत्यागहि केला पाहिजे. शहरांतील सुशिक्षित स्त्रियांचा आदर्श पुढं ठेऊन खेडयांतील बुद्धिवान नि समंजस स्त्रियांनींसुद्धां खेडयाच्या उर्जीतावस्थेसाठीं कंबर कसली पाहिजे.

**सुशीला** :—भाऊ, मला क्षमा कर ! तुझी विचारसरणी थोर आहे ! मला भावड्या पोरीला ती आचरणांत आणतां येणार नाहीं. तुला वाटत असेल, माझी बहिण माझ्या खांद्याला खांदा लावून जनसेवा करील. पण भाऊ, या बाबतींत मी खरोखर दुबळी आहे ! भाऊ, रागाऊं नकोस ! माझा तिटकारा करूं नकोस ! माझ्या जीवाची गोष्ट आतां तुझ्याशिवाय, माझ्या भाऊरायाशिवाय आतां मी दुसऱ्या कुणाला सांगणार ? भाऊ, संभाजीरावाच्या प्रेमाशिवाय, या जगांत मला दुसरं कांहींच दिसत नाहीं ! भाऊ, भाऊ ! राग आला माझा तुला ? भाऊ ! मी वेडी आहे रे ! !

**बाजीराव** :—वेडी ! खरंच वेडी आहेस ! ! आतां तुझ्या या वेडाला मी काय करूं ? वेडाच्या भरांत भलतंच करून फसलीस, नि आतां पस्तावलीस ! हा संबंध जुळणं मोठं कठिण जाणार आहे ! इतकच नव्हें तर, अण्णा तो जुळूं देणार नाहींत असं मला आतां खात्रीपूर्वक वाटूं लागलं आहे.

**सुशीला** :—मग मला आतां विष आणून दे !

**बाजीराव** :—म्हणजे ? मरायचं आहे कीं काय तुला ?

**सुशीला** :—मग कशाला जगूं या शुष्क जगांत ! जिथं प्रेम नाहीं तिथं जगण्यांत तरी काय अर्थ आहे ! मी पिंडानं स्त्री आहे. म्हणून रूढीरिवाजाप्रमाणं अण्णा मला एकाद्या परपुरुषाच्या गळीं बांधतील, पण त्या बिचाऱ्याच्या संसाराची माती करण्याची माझी इच्छा नाहीं ! भाऊ, संभाजीरावाशिवाय मी जगूंच शकत नाहीं ! तुम्ही जर माझं लग्न त्यांच्याबरोबर केलं नाहींत तर मी आत्महत्येचा राजरोस मार्ग पत्करीन.

**बाजीराव** :—ताई, तुझ्यासारख्या अल्लड तरुणीनं, प्रेमाच्या पाशांत सांपडून हेतु सफल न झाल्यामुळं आत्महत्येची गोष्ट बोलणं म्हणजे खरोखरच अविचार आहे ! शिवाय आत्महत्या करायची म्हणजे काय साधीसुधी गोष्ट नाहीं !

**सुशीला :**—भाऊ, तूं मला इतकी भ्याड समजूं नकोस, आणि माझं प्रेमहि कमी योग्यतेचं लेखूं नकोस. संभाजीरावावर जडलेल्या माझ्या प्रेमाखातर मी वाटेल तें दिव्य करायला तयार आहे! त्यासाठीं मला माझं बलिदान करावं लागलं तरी हरकत नाहीं! त्यांचं नामस्मरण करून सुखानं मरेन, पण त्यांच्या प्रीतिला धक्का लागूं देणार नाहीं.

**बाजीराव :**—शाबास! मग आणखी काय पाहिजे? तुझ्या मनाची एवढी तयारी असल्यावर मग तूं अण्णांच्या नि वहिनींच्या विरोधाला कशाला घाबरतेस?

**सुशीला :**—भाऊ, अण्णांच्या विरोधाला मी मुळींच घाबरत नाहीं. पण या कार्यात मलां तुझं साह्य पाहिजे. भाऊ, नाहीं का रे पुरवणार तूं आपल्या बहिणीची एवढी हौस?

**बाजीराव :**—छे बुवा! आपल्याला नाहीं जमायचं ते!

**सुशीला :**—भाऊ, तुझा हा लपंडावाचा खेळ पुरे कर आतां! मला तूं इतकी खुळी समजूं नकोस हं! मला सगळ ठाऊक आहे.

**बाजीराव :**—काय ठाऊक आहे तुला?

**सुशीला :**—माझ्या सुखासाठीं तुझी सारखी धडपड चालली आहे ती.

**बाजीराव :**—इतकं तुला कळलं असतं तर तूं माझ्याबरोबर हा फुकटचा वाद घालीत बसलीच नसतीस! भाऊ, हें कर रे नी भाऊ, ते कर रे! अगदीं सतावते आहेस तूं मला! ही प्रीतिची रीत विपरीत बुवा!

**सुशीला :**—भाऊ, आतां कशाला उगीच नाकाला जीभ लावतोस! घोडा मैदान जवळ आहे. मग हातच्या कांकणाना आरसा लागणार नाहीं बरं!

**बाजीराव :**—सपशेल चूक आहे तुझी कल्पना! अग मी मुळीं लग्नच करणार नाहीं. आणि केलंच तर अगदीं राष्ट्रकारणी तन-मन-धन वहाणाऱ्या मुलीबरोबरच करीन.

**सुशीला :**—म्हणजे लग्न करशील हें सिद्ध झालं!

**बाजीराव :**—त्याचा अर्थ तसा नाहीं. माणसानं ब्रह्मचारी रहाण्याच्या खोट्या थापा मारून, शेवटीं प्रेमपाशांत सापडून, वेडापिसा होण्याइतका तरी मी खास पागल नाहीं! लग्न करायचं मनांत आलंच तर तें योग्य वेळीं योग्य स्थळींच करीन. बरं आतां हा वाद राहूं द्या! अगोदर आंघोळीला पाणी काढ

पाहूं? भूक सपाटून लागली आहे. अण्णा बाहेरून येण्यापूर्वी दोन घांस पोटांत जाऊं देत. मग त्यांनी आपला शंखध्वनी सुरू केला तरी चालेल! नाहीं तर पोटांतल्या आगीमुळें त्यांचें तें आकांडतांडव पहातांच उगीच मस्तक भडकायचं!

(हणमंतराव बाहेरून मोठमोठ्यानें ओरडत, तावातावानें भांडत येतात.)

ते पहा, आलेच जमदग्नी! पळ, तूं आपली आत जा पाहूं? नाहीं तर तूंसुद्धा तडाख्यांत मिळशील. पळ— (सुशीला जाते)

**हणमंतराव** :—(प्रवेशून रागाने) या आमच्या फाजील पोराचाच हा पराक्रम! नाहीं तर या महारड्याची काय छाती होती देवळांत जाऊन देवाला शिवायची? याचा आतां बरोबरच बंदोबस्त करतो. (पाहून) काय? तूं समोर उभा आहेस? कायरे? हे धर्म बुडवायचे धंदे कुठं शिकलास? गाठींचा पैसा खर्च करून तुला उच्च शिक्षणासाठीं मुंबईला पाठवला. घराण्याचा उद्धार करणारा तूं निपजशील म्हणून तुझ्याकडं मोठ्या आशेनं पहात राहिलों, तों तूं अशा तऱ्हेनं धर्मभ्रष्ट, जातीभ्रष्ट, निपजून माझ्या आशेची, माझ्या महत्त्वाकांक्षेची होळी पेटवशील याची मला चुकून सुद्धां कल्पना आली नाहीं! त्या महारा-चांभारांना हाताशीं धरून सारा गांव फितूर केलास आणि आज, शेकडों वर्षे पवित्रस्थान मानलेली आमची देवळें भ्रष्ट केलीस! कुठं फेडशील हें पाप? तुझ्या या पापामुळं देवळातला देव कोपेल आणि आमचा सत्यानाश करील!

**बाजीराव** :—तसं झालं तर यापुढं असं करायचं मी अजिबात सोडून देईन.

**हणमंतराव** :—पण उद्यां माझं नुकसान होईल त्याला जबाबदार कोण?

**बाजीराव** :—मी जबाबदार आहे त्याला. अण्णा, तुमच्या कुणाहि माणसाच्या केसाला जर या माझ्या कृतीमुळं धक्का लागला, तर मी माझ्या प्राणाची कुरवंडी करून त्याचं रक्षण करीन! अण्णा, देवाच्या देवळांत, प्रभूच्या मंदिरांत उच्चनीच, महार–चांभार, असे भेदभाव नाहींत! देवाला सगळे सारखे! मातेला आपलं मूल कधीं तरी नकोसं होईल का? आम्हीं धर्मांध लोकांनीं स्वार्थासाठीं, प्रभूच्या लेकराना त्या हरिजनानां—आमच्याच भांवडांना आजपावेतों मोठ्या अमानुष तऱ्हेनं दूर—दूर लोटलं होतं! पण अण्णा, आतां–

लोकांच्या अंतःकरणातला प्रभू-माणूसकीला जागणारा तो देव जागा झाला आहे! आणि आजपर्यंत अस्पृश्य-अस्पृश्य म्हणून ज्यांना आम्हीं हिणवित होतों-झिडकारून लावीत होतों-ज्यांच्या सहवासाचा विटाळ मानीत होतों-त्याच आमच्या भावंडांना, आमच्या बांधवांना जवळ करण्याची सुबुद्धि आम्हांला सुचली आहे!

**हणमंत** :—सुबुद्धि नाहीं दुर्बुद्धी!! कलंकीचा पाया जवळ आला दुसरं काय! असाच भ्रष्टाकार चालू राहीला तर जगाचा प्रलय व्हायला कितीसा वेळ लागणार आहे! उगीच नाहीं जगांत लढाया होत! भूकंप होतात, झंझावात-भयंकर तुफानं नि अरिष्ट जिकडं तिकडं—हाहाःकार उडतोय? असंख्य प्राणहानी उगीच नाहीं होत! ईश्वराला कसं सहन होईल हें पातक!

**बाजीराव** :—तुमच्या सारख्या धर्ममार्तंडाच्या पोकळ बुद्धिचा पोरखेळ आहे हा सगळा! निसर्गाच्या पुढं मानवाचं काय चालणार! येनकेनप्रकारेण, स्वार्थासाठीं स्वतःच्या जन्मदात्यांशीहि बेइमान होण्याची वृत्ति जोपर्यंत मानवजातीत आहे तोपर्यंत अशा ह्या लढाया, असे हे अत्याचार चालायचेच! पापपुण्याच्या नांवाखाली क्रूर अत्याचार करण्यापेक्षां, पापपुण्य झूट समजून माणुसकी धर्म निष्ठेनं पाळणं हाच बुद्धिवान लोक खरा धर्म समजतात! बुरसटलेल्या धर्माच्या नांवाखाली आपल्या सारख्याच दुसऱ्या मानवांना नीच समजून अमानूष तऱ्हेनं वागवणाऱ्या लोकांचा थोर लोकांकडून नेहमी धिक्कारच केला जातो! कोणी अस्पृश्य बनवलं होतं या लोकानां? तुमच्या सारख्या शिकलेल्या मूठभर लोकानींच ना? निरक्षर अडाणी माणसांना हलके धंदे करायला लावायचे आणि त्यांना हीन हीन म्हणून हिणवायचं—त्याचीं अवहेलना करायची!

**हणमंत** :—जरूर करूं! अस्पृश्य नव्हे—महार—म्हाराला म्हार नाहीं म्हणायचं तर काय बामण म्हणूं? या बामणानीच हा ताळ सोडला आहे! हरिजनांना पंक्तिला घेऊन सहभोजनं काय करतात, झुणकाभाकऱ्या काय खातात—सत्यनारायण काय करतात—छे छे छे! मस्तक फिरून जातं एकएक ऐकून! विठोबाचं मंदिर हरिजनांना खुलं करावं म्हणून सानेगुरुजीनी जेव्हां उपास केला होता तेव्हांसुद्धां माझं डोकं असं भडकून गेलं होतं! बाजीराव, यापुढं तूं आपलीही बाजीरावकी पुरे कर. झाला एवढा तमाशा पुरे आहे.

**बाजीराव :**—अण्णा, तें आतां शक्य नाहीं. दलितोद्धारासाठीं नि बहुजन-समाजाच्या सुखासाठीं मी माझं आयुष्य अर्पण केलं आहे असंच समजा.

**हणमंत :**—मग यापुढं तूं माझ्या तोंडाला अशीच काळोखी फासणार?

**बाजीराव :**—छे छे! मुळींच नाहीं! माझ्या उज्वल कर्तव्यानं तुमचं तोंड उजळ करणार!

**हणमंत :**—असल्या पापी कृत्यानीं तें कालत्रयीं होणार नाहीं!

**बाजीराव :**—याला पापी म्हणायची तुमच्या देवाचीसुद्धां छाती नाहीं. अण्णा, तुम्हींसुद्धां मला या कार्यात सहाय्य करून आपल्या पदरीं पुण्य पाडून घ्या! दीन दुबळ्यांची सेवा हाच खरा पुण्याचा मार्ग!

**हणमंत :**—बाजीराव, आजाला नातवानं शिकवायचा आव आणून तूं माझा अपमान करतो आहेस?

**बाजीराव :**—मुळीच नाहीं. आणि तुमचा तसा समज होत असेल तर त्याला माझा नाइलाज आहे!

**हणमंत :**— बाजीराव—(धाक दाखवतो)

**बाजीराव :**—क्षमा करा अण्णा! खरोखर माझा नाइलाज आहे!

[बाजीराव बाहेर निघून जातो. हणमंतराव त्याच्याकडे रागानें पहात असतात. पडदा पडतो.]

★

## प्रवेश ३ रा

[गांवांतील एक वाट. सोनी एका बाजूनें व दुसऱ्या बाजूनें जानू येतात.]

**सोनी :**—आलाव? सकाळपासनं हातरुनात पोरं तडफडली तापानं त्याची दाद तरी हाय का तुमाला?

**जानू :**—ताप आला? कुनाला? धाकट्याला, थोरल्याला कीं मधल्याला?

**सोनी :**—चारी पोरं तापान फनफनता हायत! आनि तुमी! तुमी हिंडा हिकडं असे गांवगुंडासारके! नाय गे बाय! अगदीं मुळीं सुदां खंतं नाय! सकाळीं जे तुम्हीं गेलात ते आतां परत येतां ना? रानांत जातांना सांगीतलं

झेरडं साटांत भरा नि कामास या! आयकलांत माजं? आतां दोन पैसे मिळालं असत तर पोरांच्या माल्यावर चार पैशाचं खोबरेल तरी आणून घातलं असतं! घरांत पोरं मेली त्याची दाद नाय नि म्हने धाकट्या कीं थोरल्या! कामास नायतं नाय! पर पोरांच्या कडस तरी बसायच? ते पर नाय!

**जानू** :—अग पर आतां फुढं काय तं बोल? उगीच बडबड नको करूंस!

**सोनी** :—बडबडूं नको? अगदीं संताप येतो तुमचा! ज्याला सवताच्या परपंचाची काळजी नाय त्याला काय माणूस म्हणायचा! एवढा अगदीं इट आला व्हता, त कश्यास केलंव दुसरं लगीन? मला बुडवाया?

**जानू** :—सोने, किती निर्दयासारकी बोलतेसग! माज्या काळजावर निकारं पडल्यागत झालं तुज्या या बोलन्यानं! चल, परत चल बगूं! पोरास्नीं माज्या डोळ्यानीं बगूं दे माज! देवा नारायणा! माज्या कच्च्या बचन्यास्नीं सांभाळ रे बाबा!

**सोनी** :—( डोळे पुसते ) चला तुम्हीं! मी येते बाजीराव दादास्नी सांगून, पोरांचा ताप नाय काढला तर काय तरी उपाय करतील ते.

**जानू** :—मग तूं चल घरास! मी घेऊन येतो त्यास्नी! पोरांजवळ दुसरं कोन नाय साजची यळ हाय! चल बगूं तूं जा ( समोरून बाजीराव येत असतो. ) ते बग आलंच भाऊ! देव धावला! अगदीं शंबर वर्स औक्ष हाय!

**बाजीराव** :—कोण? जानोबा? म्हणजे तुम्हीं नवराबायको यावेळीं कुठं चाललांत बुवा!

**सोनी** :—( गहींवरून ) दादा! तुमचे पाय धरते! माजी पोरं वांचवा हो!

**बाजीराव** :—म्हणजे! काय झालं सोनूताई? आजारी झालंय का कोणी?

**सोनी** :—होय दादा! माजी चारी पोरं तापानं माशासारखी तडफडतायत हो! दादा, दादा —काय तरी उपाय करावो माज्या पोरास्नीं!

**जानू** :—अग पर सबूर! उगीच रडतेस कश्यास?

**बाजीराव** :—सोनूताई, घाबरायचं काय त्यांत? चल-चल पाहूं तुझ्या घरीं! काय होतयं तें पाहूयां तुझ्या मुलांना. घाबरतेस कशाला तूं? तुझ्या मुलांना लगेच उठती करतो पहा! जानोबा, ही चिठी आणि हे पैसे घ्या आणि दुकानावर जाऊन दुकानदाराला चिठी दाखवा आणि तो देईल त्या वस्तू घेऊन या. ( चिठी व पैसे देतो ) जा. लौकर घेऊन या. तोपर्यंत आम्हीं पुढं जातो हं? ( जानू जातो)

चल, सोनूताई–अशा प्रसंगाना कधींही घाबरूं नये! येईल त्या प्रसंगाला धीरानं तोंड द्यायला माणसानं सदैव तयार रहावं! मानव-प्राणी आहे त्याला आजारीपण हें असायचंच! त्याला असं घाबरून चालेल होय?

**सोनी** :—दादा देव तुमी आमचे! पांडुरंग तुमचं भलं करील! काय सांगू तुमास्नी दादा! जळल्या माज्या राबत्या घरांत चार आणे सुद्धां माजे जवळ नायत हो! तापानं फडफडणाऱ्या पोरांच्या कपाळावर उजळून घालायला सूटीचं कांडूक आनाया माज ऐपत नाय! दादा, काय सागूं! नि किती सागूं तुमास! ह्यांना नाय दिसत हा संसार! पर माजा जीव जळतो हें दळीदर बगून! किती कष्ट काढूं? किती हाल सोसूं? अरद्या पोटानं ऱ्हावंन पोरास्नीं वाडवली! तोंडचा घास दिला नि उपासीतपासी कंबर बांदून पैरेपन केलं नि माजी पोरं जगवली! त्यांची गत दादा आज कां म्हणून वो अशी झाली! देवाला माजं सुख बगवत नाय का वो? (रडते)

**बाजीराव** :—सोनूताई, इतकं काय म्हणून वाईट वाटून घेतेस? हें पहा, विचार करून जर पहाशील तर जगांत सुखी असा तुला कोणी आढळणारच नाहीं! सुख आणि दुःख हें सर्व मानण्यावर अवलंबून असतं सोनूताई! आज जगामध्यें एकेकाच्या वाट्याला एवढाली मोठीं दुःखं वाढून ठेवलेलीं आहेत कीं त्यांचं वर्णन करतांना शब्दसुद्धां अपुरे पडतील! सोनूताई, तुझ्या मुलानां आजारातून उठवण्यासाठीं मी माझ्या प्रयत्नांची शिकस्त करीन. चल, मुळीच काळजी करूं नकोस तूं! चल उगीच वेळ गमावून उपयोग नाहीं.

**सोनी** :—ती इटलादेवी माझ्या दादानां सुबुद्धी देवो नि त्यांच्या हाताला यश येवो! चला बगूं. (दोघहीं जातात)

(बाजीराव व सोनी गेल्यावर कांहीं वेळानं संभाजी येतो व लगेच सुशीला येते)

**सुशीला** :—(संभाजीस) अहो जाणार? जरा थांबाल का?

**संभाजी** :—(मागें वळून) कोण? सुशीला? खरंच माझी सुशीला माझ्या पुढं उभी आहे? स्वप्न तर नाहीं ना हें?

**सुशीला** :—स्वप्न नाहीं! वस्तुस्थिति खरी आहे! पण "माझी सुशीला, माझी सुशीला" म्हणून माझ्या जीवाला अधिक ओढ कां लावतां हो तुम्हीं?

**संभाजी** :—या केल्या गुन्ह्याबद्दल काहीं शिक्षा करायची आहे का? सुशीला, गेल्या कित्येक दिवसांचा तुझा विरह सहन न झाल्यामुळं माझा जीव

अगदीं वेडापिसा झाला होता! पण आतां ही माझ्या प्रीतिची प्रतीमा समोर पाहिल्याबरोबर माझ्या जीवांत जीव आला! पण आज या तिन्हींसांजेच्या वेळीं तूं इकडं आलीस तरी कशी?

**सुशीला** :—किती तरी दिवस झाले, तुमचं दर्शन नाहीं! जीवाची आटा-पीट करून तुमच्या भेटीसाठीं किती तळमळत होतें मी! तुमच्याबरोबर भांडण केल्यावर अण्णानीं जणू काय सैतानाचा अवतारच धारण केला आहे! सख्खी बहिण मी; पण मला अगदीं वैरीणीसारखी वागवतात! किती किती यातना सहन कराव्या लागत आहेत मला! अगदीं नको—नकोसं झालं आहे जीवन!

**संभाजी** :—बाजीराव काहीं मार्ग काढीत नाहीं का यातून?

**सुशीला** :—भाऊ तरी काय करील! उगीच त्याला तरी दोष कां म्हणून द्यायचा! आतांशा त्याला सुद्धां अण्णा अगदीं वैऱ्यासारखे वागवूं लागले आहेत!

**संभाजी** :—मग आतां पुढं मार्ग काय? पुढं काय करायचं?

**सुशीला** :—तेंच विचारायला आले आहे मी तुम्हांला.

**संभाजी** :—सुशीला, या गोष्टीवर विचार करून माझ्या मतिची गति अजिबात खुंटली आहे! यापुढं आतां तूंच माझी स्फूर्ति हो आणि आपल्या प्रीतिची नांव पैलतीरी लाव!

**सुशीला** :— मी सुद्धां अगदीं बुचकळ्यात पडले आहे हो! अण्णांच्या तोंडचे आघात सहन होत नाहींत! वहिनीच्या तोंडची मुक्ताफळें कडू लागतात! भाऊचा आधार धीराचा वाटत नाहीं! अशा समयीं तुमच्याकडं धांव घेण्या-पलिकडं मला दुसरा मार्गच राहीला नाहीं.

**संभाजी** :— उत्कट प्रेमाची साक्ष आमच्या आचारविचारांत मनोमन भासत आहे! प्रीतिच्या पोटीं भीति नाहीं आणि प्रेमाच्या साम्राज्यांत जातपात नाहीं! आमच्या वडिल माणसांना आम्हाला हें सिद्ध करून दाखवलं पाहिजे. सुशीला, तुझं निस्सीम प्रेम न ओळखण्याइतका मी नालायक नाहीं. आपल्या प्रेमाखातर तूं वाटेल तें दिव्य करायला तयार होशील याबद्दल मला पूर्ण खात्री आहे. सुशीला, आम्ही आमचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं या गावांला रामराम ठोकून दुसऱ्या कुठंहीं शहरबाजारी जाऊन आपला विवाह उरकून घेऊहि. पण

त्या नग्ना कृतीनं आम्हाला सुख लाभण्याऐवजी दुःखच भोगावं लागेल ? शिवाय तसं करण्यापूर्वी मला माझ्या दादांचा विचार करायला हवा ? माझ्यावाचून त्याना दुसरं कोण आहे या जगांत ! सुशीला, माझ्या दादानीं माझ्यासाठी एवढा स्वार्थत्याग केला आहे आणि एवढे कष्ट काढले आहेत कीं मला माझ्या सुखावर पाणी सोडून त्यांची सेवा करणं हें माझं पहिलं कर्तव्य ठरेल ! आणि तें कर्तव्य मी जर न करीन तर मी कमालीच कृतघ्न ठरेन ! सुशीला, या दुहेरी पेचांत माझा जीव हैराण होतो आहे ग ! तुझ्या अण्णानीं माझ्या दादांचा उघड उघड अपमान केल्यापासून ते अगदीं अर्धमेले झाले आहेत. ते माझी समजूत घालतात, मी त्यांची समजूत घालतो ' दोघेही दोपरीनं आम्हीं दुःखीच आहोंत ! पण चेहऱ्यावर लटकेंच हास्य आणून एकमेकाच्या समाधानासाठीं फसवाफसवीचा आमचा डाव चालला आहे ! दादाचं दुःख मला कळतंय, आणि माझं दुःख दादांना कळतंय ! पण उपयोग काय ?

**सुशीला** :—आणि तुमच्यासाठीं जन्माची दुःखी झालेली ही सुशीला, हिची वाट काय ? माझं दुःख नाहीं का कळत तुम्हांला ? कसं सांगू तुम्हांला ! तुमच्यासाठीं मी वाटेल ते हाल सहन करीन ! अण्णानी जरी मला घरातून घालऊन दिलं तरी मी तुमच्या घरीं येऊन राहीन तुमच्या दादांची वडीलांप्रमाणं सेवा करीन ! पुन्हां अण्णाच्या घराचं तोंडसुद्धां पहाणार नाहीं. यापुढं मला तुमच्याशिवाय दुसऱ्या कुठंच रहायचं नाहीं. अगदा विटलें आहे मी त्या घराला नि त्या माणसांच्या स्वभावाला !

**संभाजी** :—तुझी कशा तऱ्हेनं मानखंडना चालली आहे हें मला कळत का नाहीं सुशीला ? पण काय करणार ? अब्रूदार माणसालाहि प्रसंगीं कारणाशिवाय आघात सहन करावे लागतातनां, ते हे असे ! तूं जर त्यांना विचारल्याशिवाय घरातून बाहेर पडलीस, तर ते तुझं काय करणार आहेत ? पण त्यांच्या अब्रूसाठीं आपणाला या यातना सहन केल्या पाहिजेत ! कारण दुनिया दुरंगी आहे ! आमच्या या देशांतील बहुजनसमाजानं सुधारणेचा टेंभा वर वर कितीही जरी मिरवला तरी अंतर्यामी अजून तो सनातन धर्मालाच चिकटून आहे ! तेव्हां आपल्याला असं काहीं धाडस करतां येणार नाहीं ! आणि सुखासंबंधानं आपला संबंध जुळणं कांहीं शक्य नाहीं ! अशा या बिकट परिस्थितींत सांपडल्यामुळें माझी अवस्था अगदीं केवीलवाणी झाली आहे ! ती भूक शमविण्यासाठीं जो

प्रयत्न करावा तों खुळ्या कल्पनेनं उभा केलेला तुझ्या अण्णांचा जातीयवाद 'आ' वासून सैतानासारखा पुढं उभा रहातो! त्याच्या मानगूटीवर बसून त्याला नामशेष करण्यासाठीं पुढं सरसवांव तर माझ्या दादांच्या निराधार परिस्थितीची अचानक आठवण होते आणि हातपाय अगदीं लुळे पडतात! सुशीला, आतां तूंच सांग या प्रसंगी आपण काय करूयां?

**सुशीला** :—सत्य मार्गाचा अवलंब करणारांना प्रकाश खात्रीनं दिसतो, असं थोराचं वचन आहे ना? मग आम्हांलाहि प्रकाश दिसेल! या क्षणीच मी तुम्हांला शपथपूर्वक सांगते ही सुशीला यापुढं सर्वस्वी तुमची आहे! कितीहि संकटं आली तरी कुडींत प्राण असेपर्यंत ही सुशीला, तुमच्या चरणीं वाहिलेलं आपलं वचन कदापी बदलणार नाहीं! हेतू पूर्ण होईपर्यंत ती वाट पाहिल! आणि तो पूर्ण झाला नाहीं तर तुमच्या नामाचा जप करीत मरून जाईल!

**संभाजी** :—सुशीला, तुझ्या या अमर वचनापुढं मी काय बोलूं? पण एवढं मात्र मी खात्रीनं सांगतो कीं, विवाहापूर्वीं एकमेकांवर प्रेम करून कांहीं काळ गेल्यानंतर एकमेकाचा विश्वासघात करून, दिलेल्या वचनांना आणि वाहिलेल्या शपथांना पायदळीं तुडवून निराळा संसार थाटणाऱ्या ढोंगी प्रेमी युगुलाप्रमाणं आम्हीं आमच्या जीवनाला काळीमा फासणार नाहीं हें कल्पांतीं सत्य! अमर प्रेमाला कोण रोखूं शकणार आहे? त्या प्रेमापायीं स्वतःच्या बलिदानाचं भयंकर दिव्य करायलाहि प्रेमी जीव आनंदानं तयार असतात!

**सुशीला** :—आपणहि तशीच मरून जाऊं! प्रेम करतां करतां मेलों तर आपलं प्रेम अजरामर होईल!

> त्यागूं या सुखा प्रेमापायीं,
> या विना दुजा मार्ग नाहीं!
> जीव जिवाला जडवूनी राया,
> प्रीत मनिंची हृदयि कोरूंया,
> भेट पुन्हां कधीं भूवरी न झाली,
> होईल तरी ती स्वर्गीं आपुली!!

**संभाजी** :—अहाहा! सुशीला, आज माझ्या मनाचं पूर्ण समाधान झालं! आकाशांत जमलेल्या कृष्णमेघानीं एका क्षणांत वातावरण दूषित करावं, रागानं

एकमेकावर दांतओंठ खात आदळआपट करून कडकडाट करावा आणि त्या कडाक्याच्या भांडणाचा घोर परिणाम म्हणून अश्रूरूपानं जलधारा वाहूं लागव्यात, त्या अश्रूरुपी जलधारानीं कृष्णमेघांच्या काळ्या कृत्याचा काळेपणा धुवून निघतांच आकाश पूर्ववत् निरभ्र होऊन कोंदट झालेलं वातावरण, उल्हासीत आणि रमणीय दिसावं, तद्वत्, माझ्या मनाची स्थिती झाली आहे. सुशीला, निराशेच्या अंधकारांत चांचपडत चालणारा अंध झालों होतों मी! पण आज, या क्षणाला, तूं मला डोळस केलंस! आपल्या अमर प्रेमाची व्याख्या सांगून माझं सर्वस्व जिंकून घेतलंस! सुशीला, हा संभाजी—आतां एकटा नाहीं! त्याचा दुसरा एक जीव या जगांत आहे आणि त्याच्या जिवांत जीव असेपर्यंत तो आपल्या जिवाच्या जीवाला विसरणार नाहीं!

**सुशीला** :—जिवलगा! तोंडांतले शब्द तोंडांतच घुटमळत आहेत! देवा-ब्राह्मणांच्या साक्षीच्या अभावीं हिंदु स्त्रीला न शोभण्यासारखं वर्तन हातून घडूं नये म्हणून जिवाची सारखी आटापीट चालली आहे! नाहीं; यापुढं तुमच्या समोर उभी राहुं शकत नाहीं. जाते—जाते मी!

**संभाजी** :—जा. पण, जातां जातां-नुसत्या हाताला तरी—

**सुशीला** :—स्पर्श करायचा नाहीं हं? मराठ्याची मुलगी आहे मी! माहित आहे ना मी कुणाची बहिण आहे ती? जाते हं! (सुशीला चार पावलें चालून जाते. इतक्यांत समोरच्या दिशेला जानू पायाला फुरसें डसल्यामुळें ओरडतो. त्याची ओरड ऐकतांच सुशीला घाबरते व परत येऊन संभाजीला मिठी मारते. तो तिला घाबरूं नको म्हणून सांगत असतो. इतक्यांत रक्तबंबाळ झालेला पाय हातांत धरून जानू लंगडत आणि ओरडत पुढे येतो. त्याच्या पायाला वेदना जास्त होत असल्यामुळें तो जमिनीवर गडबडा लोळत असतो.)

**जानोबा** :—अगे अय—गे—!! मेलो-मेलो!! अरे बाबा रे मेलो!! किरडू! किरडू! घणस!! (ओरडतो)

**सुशीला** :—(घाबरून) अग आई ग मेले! (परत येऊन संभाजीला बिलगते)

**संभाजी** :—थांब! घाबरूं नको! कोण आहे तें मी पहातो हं! अरे? कोण जानोबा? जानोबा, काय झालं? पायाला काय झालं तुमच्या? अरे! रक्त वाहतयं पायातून? काय झालं जानोबा?

**जानू** :—( रडत ) दैवानं दावा सादला ! अग आय ग ! संबाजीदादा ! मी मरनार आतां ! किरडूं डसलं वो माज्या पायास ! फुरसं चावलं हो मला !

**संभाजी** :—काय फुरसं चावलं ? अरेरे ! जानोबा-जानोबा घाबरूं नका ! नीट पाहिलंत ना तुम्हीं ? फुरसंच होतं ना ? ( जानू मानेनंच हो म्हणतो. तो सारखा तळमळत असतो. सुशीला त्याला वारा घालीत असते. संभाजी आपल्या अंगरख्याच्या खिशातून औषधाची मुळी काढून कातरून त्याला खायला देतो. व ती दोघंजणं त्याचं शांतवन करीत असतात. इतक्यांत हणमंतराव रागारागानें सुशीलेला शोधीत येतात. तिला व संभाजीला एकत्र पाहून जवळच विव्हळत पडलेल्या जानूकडे लक्ष न देतां सुशीला व संभाजीवर ते एकदम संतप्त होतात. )

**हणमंत** :—( रागानें सुशीलेचा हात पकडून ) बेशरम पोरी ! काय करतीस तिथं ?

**सुशीला** :—( थरथर कांपत ) अण्णा—

**हणमंत** :—चूप. दांत पाडून टाकीन तोंडावाटे शब्द निघाला तर ! चल, चल नीघ ! तुला चौदावं रत्नच दाखवतो—फाजील कार्टी !

**सुशीला** :—अण्णा—या जानोबांची स्थिती पहा—

**हणमंत** :—मरूं दे त्या जान्याला ! नीघ इथून-नाहींतर कपाळांत घालीन ही काठी. निर्लज्ज बेशरम कार्टी ! ! ( सुशीला रडत जाते ) आणि या निर्लज्ज माणसाला काहीं लाज आहे कीं नाहीं ?

**संभाजी** :—हणमंतराव, जरा प्रसंग पाहून तरी बोला ! या बिचाऱ्याला किरडवानं खाल्लं आहे याला अगोदर औषधउपचार करूं या !

**हणमंत** :—घोणसानं खाल्लंना ? देव पावला ! अरे तो देव काय लांब आहे ? गांवची पांढर काय झोपी गेली आहे ? तिच्या देवळांत तुम्हीं भ्रष्टाकार केलांत ना ? आतां खा हें प्रायश्चित्त ! भोगा आपल्या कर्माची फळं ! ! ह्या जान्याला मोठेपणा पाहिजे. महारकी सोडून भटकी हवी याला ! कां नाहीं डसणार किरडूं ? सत्यानाश होऊन जाईल सगळ्यांचा !

**संभाजी** :—हणमंतराव, पुरे झालं तुमचं शहाणपण ! कावळ्याच्या शापानं कधीं ढोरं मरत नाहींत, समजलांत ? चालायला लागा इथून.

**हणमंत** :—बरं बरं, पाहून घेईन— ( रागानें निघून जातो. )

**जानू** :—( विव्हळत ) दादा-दादा—खरंच काय वो देव कोपला माजेवर ! माजी पोरं-तिकडं-तापानं तडपडतायत ! त्यासनी औशद आनायास बाजीराव-भाऊनी-माज धाडला ती औवशंद न्हाली माजे गाटीस-आतां काय करूं ! माजी पोरं मरनार ! मी मरनार ! दादा-माज कसातरी घरापावत न्हवा वो ! माज्या पोरास्नी मला दीष्टीनं तरी बगूं दे ! ( रडतो )

**संभाजी** :—जानोबा ! अरे काय खुळावलांत की काय तुम्हीं ! अहो आम्हीं खेडवळ माणसं. असले विषबाधेचे प्रसंग आमच्यावर घटकेपाऊलीं यायचेच ! जीवजिवाणूंच्चा विषाला घाबरून चालेल होय ?

**जानू** :—दादा, देवाचा कोप झाल्याशिवाय-कुनी तरी चेटूक केल्यावीगर असं नाय वो व्हयाचं '

**संभाजी** :—काय खुळ्या कल्पना ह्या जानोबा तुमच्या ! अहो तुमचा पाय पडला असेल त्या जीवावर ! आपल्यापासून त्याला उपद्रव झाल्याशिवाय तो चावेल कसा बरं ? बरं तें कांहीं असो ! तुम्हीं आतां माझ्या पाठीवर बसा पाहूं, आपण जाऊयां घरी ! जानोबा घाबरतां कशाला तुम्हीं ? अहो या रोगासाठीं रामबाण औषधी आहे माझ्या जवळ. चला. चार दिवसांत झणझणीत बरें करतो तुम्हाला !

[ जानोबा संभाजीच्या पाठीवर बसतो व संभाजी त्याला घेऊन जातो. पडदा ]

★

## प्रवेश ४ था

[ **स्थळ** —हणमंतरावाचें घर. सुशीला बाहेरून येते.
तिच्यामागून हणमंतराव येतात. ]

**हणमंतराव** :—फाजील कार्टी ' असा चावटपणा करते काय ? तंगडी मोडून ठेवीन-या हणमंतरावाचा तडाखा माहित नाही ! अजूनपर्यंत ताई, ताई म्हणून गोंजारली त्याचा फायदा काय हा ?

( सुशीला आंत जाते व यमुना आंतून बाहेर येते. )

**यमुना** :—कुठं होत्या ? सांपडल्याना शेवटीं ? होत्या कुठं ?

**हणमंत**—आतां सांगायला सुद्धां लाज झाली आहे ! आमच्या तोंडाला काळं फासायची वेळ आणली या पोरीन ! ज्याची संगत नको म्हणून रात्रंदिवस ठाहो फोडतो तर ही कार्टी मुद्दाम त्याचीच संगत करते !

**यमुना** :—पहा आता तुम्हींच ! मी बोलते तेव्हां भाऊजीना वाईट लागतं. अगदीं जेव्हां तेव्हां बहिणीचा कैवार घेऊन उठतात ! आतां सांगा त्यानां हा पराक्रम ! ते बघा आले ! [बाजीराव येतो.] आलांत ? आतां आपल्या बहिणीच्या पराक्रमाचे पोवाडे ऐका ! जेव्हां तेव्हां मला रोखतां ना ? जरा कुठं रितीचं बोलले तरी तुम्हांला आवडत नाहीं. आतां ही डोईजड झालेली मुलगी आवरा कशी ती ?

**बाजीराव** :—म्हणजे, ताईबद्दल बोलतेस कीं काय वहिनी तूं ?

**यमुना** :—हो हो, तुमच्या ताईबद्दल ! आतां चांगली चार घटका रात्र पडली तेव्हां आतांशी तिला कुठून शोधून आणली यानी,

**बाजीराव** :—म्हणजे ? इतका वेळ कुठं गेली होती बुवा ?

**हणमंत** :—नाहीं नाहीं; बहिणीचा कैवार घे. आतां आश्चर्यात कां पडलास ? मी बोलतो तेव्हां माझं तोंड दिसतं तुला ! अरे ही, तुझी बहिण त्या संभाजी-बरोबर त्या पाठाराच्या वाटेवर चांगली दोन घटका रात्र पडेपर्यंत गुजगोष्टी करीत होती. ही काय रीत झाली ? आतां सांग, आमच्या तोंडाला काळोखी फासणार कीं नाहीं ही पोर ?

**बाजीराव** :—ही तिच्या हातून चूकच झाली म्हणायची !

**यमुना** :—नुसती चूक नाहीं घोडचूक झाली आहे घोडचूक !

**बाजीराव** :—होहो, घोडचूक झाली ! अण्णांचा शब्द तिनं पाळायला हवा होता. वडिल माणसाची आज्ञा मोडते म्हणजे काय ?

**हणमत** :—पहा, आतां माझं म्हणणं पटायला लागलं तुला ! अरे हा अब्रूचा प्रश्न आहे ! आम्हां घरंदाज लोकांच्या मुलीनीं जर असं ताळतंत्र सोडलं तर आमचं पाणी राहीलं कुठं ?

**बाजीराव** :—अगदीं बरोबर आहे आपलं म्हणणं !

**हणमंत** :—बस्स तर ! यापुढं या पोरीला घराची पायरीसुद्धां ओलांडायला देणार नाहीं.

**यमुना** :—लवकरच मुहूर्त पाहून जमवून टाकावं लग्नाचं म्हणजे एकदांची काळजी गेली !

**हणमंत** :—अग पण स्थळ मिळायला पाहिजे ना ?

**बाजीराव** :—हो ना ? तो एक मोठा प्रश्न आहे ! अण्णांच्या तोलाला जमेल असंच स्थळ पाहिजे.

**हणमंत** :—माझ्या ? आणि तुझ्या नाहीं ?

**बाजीराव** :—वा ! नाहीं कसं ? माझ्याहि ! पण असलं उत्तम स्थळ जमायला पाहिजे नाहीं का ? तेव्हां हें लग्नाचं तूर्त तुम्हीं दूरच ढकला. मात्र तिनें असे चाळे करूं नयेत म्हणून तिच्यावर करडी नजर ठेवा.

**हणमंत** :—आतां तुझ्यासमक्षच तिला इथं बोलावतों, आणि तिनं केलेल्या कृतीचा तिला जाब विचारतो. ( यमुनेस ) बोलाव ग तिला बाहेर.

**बाजीराव** :—आतां एक वेळ जाऊं द्या ! पुन्हां अस केलं तर मग विचारा.

**यमुना** :—नाही, नाहीं, असं प्रत्येक वेळीं सोडून देत गेलों तर भलतंच होऊन जाईल नि कपाळाला हात लावायची पाळी आमच्यावर येईल !

**हणमंत** :—हो, जगाचे अनुभव आहेत असे. तें कांहीं नाहीं, बोलाव तिला इकडं ? थांब मीच हांक मारतो.

**बाजीराव** :—तोपर्यंत मी जरा बाहेर जाऊन येतों. ( जातो. )

**हणमंत** :—तूं बाहेर पळालास म्हणून मी तिला विचारायचं सोडीन होय ? सुशीला, ये—सुशीला—( सुशीला बाहेर येते. ) सुशीला, त्या संभाजीबरोबर या पुढं कोणत्याहि प्रकारची सलगी ठेवूं नकोस म्हणून सांगीतलं होतं मी तुला ? काय विचारतों मी ? आज अशा रात्रींच्या वेळीं त्याला भेटायचं तुला काय कारण होतं ?

**यमुना** :—बोलायला वाचा दिली आहे कीं नाहीं देवानं ? " खाली मुंडीं नि पाताळ धुंडी" हलकी नसते बरं ?

**हणमंत** :—पहा तोंडावाटे ब्र काढते आहे काय कोडगी ? सुशीला, मी काय विचारतो तुला ? तूं त्या संभाजीला कां भेटायला गेलीस ?

**सुशीला** :—अण्णा, पुन्हां पुन्हां तुम्हाला काय सांगू मी ! मी एकदां तुम्हांला सर्व सांगीतलंच आहे !

**हणमंत** :—पण तें आम्हांला नापसंत आहे म्हणून सांगितलं होतं ना तुला ?

**सुशीला** :—हो !

**हणमंत** :—मग पुन्हां त्याला भेटायला कां गेलीस ?

**सुशीला** :—त्यांना भेटावसं वाटतं म्हणून !

**यमुना** :—ऐका आतां !

**हणमंत** :—काय ऐकायचं ? आमच्या बेचाळीस पिढ्या नरकांत टाकणारे हे चाळे मला नको आहेत.

**यमुना** :—पण त्यांना ते करायचे आहेत ना ?

**हणमंत** :—ती काय करते या पुढं ? माझ्या मर्जीविरुद्ध वागूं लागली तर बहिण म्हणून दया करणार नाहीं, लाथेनं तुडवीन.

**सुशीला** :—अण्णा, आजपर्यंत पुष्कळ ऐकून घेतलं तुमचं ! पण आतां मला अगदीं असह्य झालं आहे हें सगळं ! तुम्हीं दोघानीं माझा नाना तऱ्हेनं छळ मांडला अहांत ! मला अशा तऱ्हेनं जिवंत जाळण्याचा काय अधिकार आहे तुम्हालां ?

**हणमंत** :—माझा अधिकार विचारतेस ? थोबड रंगवून टाकीन ! ( मारायला जातो. )

**सुशीला** :—हात आवरा ! बहिणीवर हात उगारणारा भाऊ कसाबापेक्षांहि कसाब असला पाहिजे !

**हणमंत** :—भावाची अब्रु चव्हाट्यावर मांडणाऱ्या बहिणीला भाऊ कसाबकरणीनं वागवणार नाहीं तर काय देवी म्हणून तिची पूजा करील ?

**सुशीला** :—अब्रुच्या नांवाखाली दांभिकपणानं स्वतःचा स्वार्थ साधणाऱ्या भावाला माझ्यासारखी बहिण कवडीचीसुद्धां किंमत देणार नाहीं. भावानं आपलं भाऊपण राखायचं असतं ! बहिणीला वैरीण समजून तिच्या कडून भगिनीप्रेमाची अपेक्षा करणं म्हणजे निव्वळ स्वार्थांध वृत्ति ! बहिणीची लाडकी हौस पूरवूस जीवाच्या मोलानं तिच्यावर माया करणारा भाऊच भाऊबिजेच्या ओवाळणीला पात्र असतो. भाऊ म्हणजे वारसाहक्क गाजवणारा निर्दय मालक नव्हे ! आणि बहिण म्हणजे मालकीच्या निर्जीव वस्तुसारखी

गिऱ्हाईकाला विकून टाकायची वस्तु नव्हे. बहिणीच्या सुखासाठी झटणं हें भावाच कर्तव्य आहे ! तें कर्तव्य राहीलं बाजूला नि हे भोग आले आहेत माझ्या नशिबाला !

**हणमंत** :—सुशीले, तूं माझा अंत पाहूं नकोस !

**यमुना** :—अशी उर्मट भाषा बोलून आम्हांलाच वाईट ठरवतां काय तुम्हीं ? चांगले उपकार फेडतां आहांत !

**हणमंत** :—आजपर्यंत प्रतिपाळ करून तुला वाढविल्याचं जर अशा तऱ्हेनं प्रायश्चित्त मिळणार असेल, तर यापुढं आपलं तोंड आम्हाला दाखवूंसुद्धां नकोस.

**सुशीला** :—इच्छा तुमची ! या घरातून तोंड घेऊन जायला मी तयार आहे !

**यमुना** —म्हणजे ? दुसऱ्याचा हात धरून पळून जाणार की काय तुम्हीं ?

**हणमंत** :—मग आमच्या अब्रुचा डंका चांगला वाजेल जगांत !

**सुशीला** :—तसा प्रसंग येऊं नये म्हणून आजपर्यंत मोठ्या सहनशीलतेनं वागले, पण माझ्या म्हणण्याचा माझ्या विनंतीचा तुम्हीं तिळमात्रहि विचार केला नाहींत !

**हणमंत** :—निर्लज्जपणानं पुन्हां पुन्हां तेंच तेंच बोलायला तुला लाज कशी वाटत नाहीं ? सुशीला, फाजील बोललीस तर अंधार कोठडींत उपाशी कोंडून ठेवीन आणि तुझी मस्ती जिरवीन !

**सुशीला** :—निर्दय कसायासारखा माझा छळवाद मांडलात तर तुमच्या-समक्ष डोकं आपटून प्राण देईन ! !

**हणमंत** :—इथंपर्यंत तुझी तयारी आहे का ?

**यमुना** :—आता हें विपरीत ऐका !

**सुशीला** :—अण्णा, मी तुम्हाला निक्षून सांगतें, याउप्पर जर तुम्हीं माझा असाच छळवाद माडाल तर तुमच्यासमक्ष मरून जाईन पण माझा निश्चय मी कल्पांती बदलणार नाहीं !

**हणमंत** :—या हणमंतरावानं आपलं म्हणणं आजपर्यंत कधिंहि खोटें पडूं दिलं नाहीं; आणि हा तर धडधडीत माझ्या अब्रुचा, माझ्या घराण्याचा

माझ्या प्रतिष्ठेचा, माझ्या मानापमाचा प्रश्न असतांना तो खोटा पडूं देऊं? शक्य नाहीं! सुशीला, माझ्या म्हणण्याप्रमाणं तुला वागलंच पाहिजे.

**सुशीला** :—मग माझाहि निश्चय कायम ठरला!

**हणमंत** :—कसला निश्चय तुझा?

**सुशीला** :—आत्महत्त्या करायचा!

**हणमंत** :—बेशरम पोरी, स्वतःच्या गळ्याला फांस लावून मला तुरूंगात डांबायचा तुझा विचार आहे कीं काय? आतां मग कमाल झाली! तुझ्या पुढं माझी मति हरली! अगदीं पुरेपूर हरली!! बेजबाबदार फाजील कार्टे, काय आरंभलंयस काय तूं हें?

**सुशीला** :—दुसऱ्याच्या सुखदुःखाचा तिळमात्रहि विचार न करतां, आपलाच हेका धरून दुसऱ्याच्या आयुष्याची राखरांगोळी करणाऱ्या तुमच्या सारख्या हेकेखोर प्रतिष्ठितांना ताळ्यावर आणायला माझ्यासारख्या तरुणीनं आपल्या प्राणांचं बलिदानच केलं पाहिजे.

**हणमंत** :—खुनाचा आरोप आमच्यावर शाबित करून आम्हांला फांसावर चढवणार तूं? बेइमान कार्टे, चांगली कुलदीपक निपजलीस?

**यमुना** :—ऐकलंत का? त्यांच्या मनास वाटेल तसं त्यानां करूं द्या! या असल्या काव्यानं धडगत नाहीं बरं आपली! ही अंबाबाई, एक दिवस आम्हांला-सुद्धां जगांतून उठवील!

**हणमंत** :—सुशीला, जा चालती हो माझ्या घरातून.

**सुशीला** :—मुळीच जाणार नाहीं! हें घर माझंहि आहे! माझासुद्धां हक्क आहे या घरावर!

**हणमंत** :—सुशे—( रागानें तिला मारण्यासाठीं धावत जातो. ) ( यमुना त्याला आडवते. हा प्रकार पाहून संतप्त झालेली सुशीला आपोआप रडूं लागते. )

**सुशीला** :—अण्णा, मारा मला! माझा जीव घ्या! या जगांतून मला कायमची नाहींशी करा! तुमच्या मोठ्या घराण्याला काळोखी फासणारी, तुमच्या अब्रुला कलंक लावणारी ही अभागी सुशीला—तुमची बहिण—हिच्या नरडीला नख लावून हिचा प्राण घ्या! मात्र हें कृत्य तुम्हीं कशासाठीं करणार अहात

याचा पूर्ण विचार करा! खोट्या अभिमानासाठीं, खोट्या प्रतिष्ठेसाठीं, खोट्या जातिय भावनेसाठीं, जगांतील सर्व बंधूचं प्राणापेक्षाहि श्रेष्ठ असं जें भगिनीचं नातं तें केवळ क्षुल्लक स्वार्थसुखासाठीं तुम्हीं—तुम्हीं पायदळीं तुडवायला तयार व्हा! तुडवा, त्या मंगल भगिनीप्रेमाला आपल्या पायदळीं तुडवा!! अण्णा! तुम्हांला कठोर बोललें असेन! तुम्हांला मी दुःखहि दिलं असेन! क्षमा करा! अण्णा या तुमच्या अज्ञान वेड्या बहिणीला क्षमा करा!! जाते मी! या घरांतून, बाबांच्या या मंगल भुवनांतून, आईच्या या पवित्र मंदिरांतून जाते! अण्णा! तुमची प्रतिष्ठा, तुमचा मान, तुमची अब्रु, तुमच्या घराण्याचा मोठा घरंदाजपणा सारं सारं काहीं तुमच्या जवळ तुम्हीं अगदीं जपून-जपून ठेवा! त्या मोहमायेपुढं तुम्हांला तुमच्या बहिणीची किंमत कुठून असणार! अण्णा! तुम्हांला बहिण नव्हती असंच समजा आणि सुखी व्हा! या बहिणीपासून तुमच्या अब्रुला तिळमात्रहि धक्का पोहचणार नाहीं याची पूर्ण खात्री बाळगा!—( रडत असते )

**हणमंत** :—( काकूळतीनें ) सुशीला ! सुशीला—

**यमुना** :—जाऊं देत कुठं जातायत् त्या. आम्हांला नको कुणाची एवढी धमकी!

**हणमंत** :—( गहिंवरून ) सुशीला, तूं माझ्या काळजाला जखम केलीस! काय करूं? कसं करूं? सुशीला? सुशीला—

**सुशीला** :—अण्णा! जाते--जाते मी—( सुशीला रडत रडत बाहेर निघून जाते. हणमंतराव पश्चात्ताप झाल्यासारखे विचार करीत बसलेले असतात. यमुना त्यांच्याकडे रागारागानें पहात असते. इतक्यांत बाजीराव येतो. )

**बाजीराव** :—हें काय? तुम्हीं दोघंही अशी स्तब्ध कां? अण्णा, तुमचा चेहरा असा उतरलेला कां? वहिनी, तूं अशी रागावलेली कां दिसतेस? काय झालं, काय बुवा असं? आणि सुशीला कुठं दिसत नाहीं?

**यमुना** :— त्या गेल्या घर सोडून.

**बाजीराव** :—घर सोडून गेली? म्हणजे? कुठं गेली ती?

**यमुना** :—आम्हांला नाहीं ठाऊक कुठं गेली ती?

**बाजीराव** :—म्हणजे तुम्हीं तिला हाकलून लावलीत कीं काय घरांतून?

**यमुना** :—आम्हीं कशाला हाकलून लावूं ? आम्हांलाच अद्वातद्वा बोलून त्या चालत्या झाल्या.

**बाजीराव** :—अण्णा खरं हें ? सुशीला घरांतून निघून गेली !

**हणमंत** :—होय, मी तिच्यावर रागवलों म्हणून ती गेली ! बाजीराव तुम्हीं दोघंही भांवड आपलं तेंच खरं करतां आणि मग माझा राग अनावर होतो आणि शेवटीं त्याचा हा अस्सा परिणाम होतो.

**बाजीराव** :—अरेरे ! अखेरीस ताईला तुम्हीं घरांतून हाकलून लावलीतच ना ! धन्य असो तुम्हां नवराबायकोची !

**हणमंत** :—बाजीराव, सुशीलेला तिळभरहि अपराधी न ठरवतां तूं मलाच दोष देतोस ?

**बाजीराव** :—मग काय करू ! कशी झाली तरी सुशीला अजाण आहे ! तिला तुम्हीं भरल्या घरांतून हाकलून लावलीत, आतां कुठं जाईल ती ?

**हणमंत** :—भीक मागूं दे रस्त्यावर ! एवढी मिजास हवी कशाला ?

**बाजीराव** :—तिनं भीक मागीतलेली तुमच्या नि वहिनीच्या प्रतिष्ठेला शोभेल का ? अण्णा, माझी कल्पना नव्हती तुम्हीं इतके निष्ठूर असाल म्हणून ! एकुलती एक तुमची लाडकी बहिण तिचे लाड पुरवणं तर राहोच, पण तिला घरांत नांदू सुद्धां दिली नाहींत तुम्हीं ! निर्दयपणानं तिला घरांतून हाकलून लावलीत !

**यमुना** :—धडधडीत आमचा अपमान झाला असतांना आम्हीं स्वस्थ बसावं कीं काय ?

**बाजीराव** :—कसला अपमान झाला तुमचा ? तिनं आपल्या मनाप्रमाणं आपला जन्माचा जोडीदार नेमला हा तुमचा अपमान झाला ? तुमचं बेमुर्वत बोलणं तुमची कठोर वागणूक तिला असह्य झाल्यामुळं चांगल्या झणझणींत शब्दांत कदाचित तिनं तुमची कानउघडणी केली असेल, म्हणून तुमचा अपमान झाला ? खोटा अभिमान उराशीं बाळगून खऱ्या जातियतेचा डांगोरा तुम्हीं नवराबायको सारखा पिटीत अहांत. पण आज दुनियेंत काय चाललं आहे याची तुम्हांला तिळभर तरी जाणीव आहे का ? सारा गांव आज तुमच्याविरुद्ध आहे. तुमची ही ' रावकी ' लोकांना आतां अगदीं असह्य झाली आहे !

**हणमंत** :—ही सगळी तुझी चिथावणी आहे ! गावच्या महारापासून तें सख्या बहिणीपर्यंत माझ्याविरुद्ध तूं सर्वांना चिथावलं आहेस.

**बाजीराव** :—मुळींच नाहीं. दुसऱ्याच्या तोंडानं पाणी प्यायला जगांतले सगळेच लोक कांहीं आतां इतके दुधखुळे राहीलेले नाहींत. प्रत्येकाचं हित प्रत्येकाला कळतंय ! सरकारी कायदे धाब्यावर बसवून अनितीनं चालणारांना कधींहि यश येणं शक्य नाहीं ! स्वतःच्या मोठेपणासाठीं दुसऱ्याच्या आयुष्याची माती करणाऱ्या आपमतलबी लोकांना कधींहि जय मिळणार नाहीं.

**यमुना** :—म्हणजे अखेरीस आम्हींच मूर्ख झालों ?

**बाजीराव** :—नुसती मूर्ख नाहींत तर शतमूर्ख अहांत तुम्हीं ! सांप्रतच्या जगांत जातीयवादाचा बीमोड होत असतांना, मी उच्च आणि तूं नीच म्हणून तुम्हीं दुसऱ्यांच्या भावना कां दुखवता ? कांहीं प्रसंगीं तर तुम्हीं प्रतिष्ठीत लोक असहाय्य लोकांना जन्मांतून उठवता अहांत !

**हणमंत** :—तुझ्यासारख्या समाजसुधारकांनीं कितीहि जरी कोल्हेकुई केली तरी आमचा सनातन धर्म, आमचा जातीयवाद, जात्यभिमान आम्हीं मुळींच सोडणार नाहीं ! समजलं ?

**बाजीराव** :—मग या फाजील मूर्खपणाची फळ तुम्हांला भोगावीं लागतील !

**हणमंत** :—बाजीराव, तोंडावाटे न निघणारे शब्द निघतील. चालता हो माझ्या समोरून.

**बाजीराव** :—सख्ख्या बहिणीला हाकलून लावलीत आणि आतां मला सुद्धां चालता हो म्हणून सांगता अहांत, पण अण्णा या गोष्टीचा थोडासा विचार करा !

**हणमंत** :—कांहीं विचार करायचा नाहीं मला. तूं चालता हो माझ्या घरातून. तुम्हीं सर्व जण शहाणी आणि मी मूर्ख काय ? मी मूर्ख ? [ बाजीराव रागानें बाहेर जातो. हणमंतराव संतप्त मनाने येरझारा घालीत असतात. यमुनाबाई त्यांच्याकडे टक लावून पहातच असते. इतक्यांत पडदा पडतो. ]

*

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

[ स्थळ :—टेकडीवरील जानोबाच्या झोपडीसमोरची वाट. सोनी हातांत आरती घेऊन देवीचा नवस फेडण्यासाठीं देवळांत जात असते. दुसऱ्या दिशेनें जानू येतो. ]

**जानू** :—कुटं ग चाललीस ?

**सोनी** :—नवस फेडाया !

**जानू** :—नवस ? कसला ग ? नि कशासाटीं बोलली व्हतीस ? नि कोनास ?

**सोनी** :—आतां काय करूं ह्या येडास ! अवो अगदींच हो कसे तुमी भोळे ? अवो, नवस केला व्हता इटलादेवीस ! माजी आय पावली नि माजी पोरं बरी झाली ! आनि तुमचा इसार वो कुनी बरा केलांन ? माजे आयनं इटलादेवीनंच ना ? आनि तिची तुमास आटवान नाय ? आतां करूं तरी काय ह्या यडास !

**जानू** :—होय माजे आयसी इटलादेवी ! चुकलों ग माजे माय ! या लेकरास मापी दे नि पदरांत घे ! ( तिथूनच देवळाच्या दिशेकडे पाहून नमस्कार करतो )

**सोनी** ·—आतां आटवान झाली देवीच्या पाया पडायस ? काय मेला सभाव ?

**जानू** :—अग आतां माज काय ठावं, तूं हा इटलादेवीस नवस केलेला ! माज वाटलां संबाजी दादांच्या वसदान मांज बरा वाटला नि बाजीराव भाऊंच्या दव्यानं पोरं बरी झाली ! किती तरास काढला त्यांनीं आमचेसाठीं ? रातीचा दिस करून धा कोसावरनं दाकतरास आनला ! आमचे साठीं उपासीतानं वनवन हिंडलं ! रातभर डोळ फोडलं ! त्याचं माज्या बाबाचं उपकार ह्या जलमांत काय फिटायच नाय !

**सोनी** :—अवो, त्यांनीं दवं केलानी, दाकतरासबी आनलानी, आमचेसाठीं लय लय म्हेनत पर घेतलानी हें सारं खरं हाय ! आनि त्याचं उपकार आमी इसारलों तर आमास दुनियेंत अन मिळायचं नाय ! पर त्यासनी तसी बुदी नि

बरकत माजे आयनं इटलादेवीनंच देलानंना ? नायत त्या बिगर आमां कर्मदरिद्र्यांचे उपेगी पडलं असतं का कोनी ?

**जानू** :—हे मातर खरं ! मानसास चांगली इगुत सुचाया देवाची करपाच हावी ! सोने, तुज्या इटलादेवीची करपा आमच्यावर हायच, पर त्या बराबर संबाजीदादा नि बाजीराव भाऊची बी इसरू नकोस हो !

**सोनी** :— हे माज सांगतायसा तुमी ? अवो एकयळ तुमी बेमान व्हाल ! सारा गांव बेमान व्हयल, पर हि सोनी नाय हो बेमान व्हायची ! कुडींत परान आस पावत कुनाच्या उपकाराची आटवान इसरायची नाय ही सोनी !

**जानू** :—बरं जा आतां. बोलत नको ऱ्हावं लय. देवीचा नवस फेड नि लवकर ये.

**सोनी** :—अवो, पन सुसीलातायस आमां गरीबांच्या झोपडींत आनून ठेवलांनी हें बाजीरावदादांचं गौडबंगाल हाय तरी काय ?

**जानू** :—त्याचा आजून पावत माज बी उलगडा नाय. पर त्यांत त्याची काय तरी इगुत हाय ! सोने, ते बग, बाजीरावभाऊंच हिकडं येतायत. तूं जा. जावन ये लौकर. ( सोनी जाते. दुसऱ्या बाजूनं बाजीराव येतो. ) जुवार सायब !

**बाजीराव** :—नमस्ते ! काय जानोबा ? एकंदरीत आमच्या अण्णाचा देव बाधला म्हणायचा तुम्हांला ! मंदिरप्रवेशांत तुम्हीं पुढाकार घेतलांत म्हणून तुमच्या पायाला विषार झाला आणि तुमची मुलं तापानं आजारी पडलीं अशी जिकडं तिकडं बोंब उठवली होती आमच्या अण्णानीं ! आधीच आमच्या लोकांचा देवदेवस्कीवर आणि खोट्यानाट्या करणीवर विश्वास फार, त्यांत हटकून प्रसंग उत्पन्न झाल्यावर तर विचारूंच नका ! अगदीं शंभर टक्के विश्वास ! हणमंतरावाचं खोटं जानू महाराला बाधलं म्हणून काहींजण ओरडत होते आणि आमच्या उद्योगांत खो घालीत होते. पण आतां कसं अगदीं शांत झालं आहे वातावरण !

**जानू** :—अवो व्हयाचंच ! सत्यानं चालल त्यास तो देव जरूर बरकत देयल. त्यास कदीं अपेस देयाचा नाय ! त्या यळी माज काय कमी सतावलानीं लोकांनीं ? पर मी दाद देली नाय कोनास ! माजा आपला देवावर भरावसा ! मी म्हनायचा ! पांडुरंगा ! मी जर खोटं काम केलं आसल तर माज मार ! पर माज काम जर तुजे पायीं रुजू आसल तर मातर माज तार !

**बाजीराव** :—मग तुमची कामगिरी देवाघरीं रुजू आहे तर ?

**जानू** :—हें काय इचारायस हवं ? अवो मोठ्या मोठ्या, मीं मी म्हननारांची जबान बंद झाली आपलं काम बगून ! अवो, तुमचे अन्ना एवढे कर्दनकाळ, पर ते बी आतांस अगदीं मोंव मोंव कापसासारकं आलायत बगा धाऱ्यावर.

**बाजीराव** :—हो बुवा ! आमच्या अण्णांच्या स्वभावांत हल्लीं बराच फरक झालेला दिसतो. त्यांचे पूर्वीचे विचार अगदीं साफ बदलून गेले. त्यांचा बुद्धिभेद झाला म्हणायला मुळींच हरकत नाहीं. आणि असं होणं साहजीक आहे. कारण सबंध गावाला जर आमचं म्हणगं पटूं लागलं तर त्यांच्या एकट्याच्या विरोधाला कोण जुमानतो ? मात्र अण्णांना शहाणपण सुचलं खरं ! आपलं कांहीं चालत नाहीं हें पाहून योग्य वेळींच आपल्या विचारांची दिशा बदलली हे त्यांनीं एका परी आपल्या हिताचंच केलं ! त्यांनीं आपला पूर्वीचाच हट्टीपणा कायम ठेवला असता तर मलासुद्धां घरावर तुळशीपत्र ठेवून बाहेरचा रस्ता धरावा लागला असता. आमची वहिनी सुद्धां वारा वाहिल तशीच पाठ फिरवणारी आहे ! एक मात्र खरं जानोबा, सुशीलेला तुमच्या घरीं कुणालाहि नकळत आणून ठेवली हें अगदीं आपल्या पथ्यावर पडलं ! तुमचं घर हें अगदीं इकडं एकांत जागीं. इकडं कुणाची वर्दळ नाहीं त्यामुळं सुशीला कोणाही ओळखीच्या माणसाच्या दृष्टीस पडूं शकणार नाहीं. शिवाय तुमच्या घरीं मी सुशीलेला आणून ठेवीन हें कुणाच्या स्वप्नांतसुद्धां येणार नाहीं.

**जानू** :—पन आतां हें लोकास्नी समाजल्यावर कसं व्हयल भाऊ ?

**बाजीराव** :—कांहीं होत नाहीं. जानोबा, तुम्हीं आम्हांला वडलांसारखे. माझ्या ताईला तुम्हीं आपल्या मुलीप्रमाणं सांभाळाल याची मला खात्री होती म्हणूनच ना तिला तुमच्या स्वाधीन केली ?

**जानू** :—खरंच तायसायब माज्याकडं आल्यापासनं माज आबाळाएवढा आनंद झाला ! माजे बायस खायापिया देयास काय हाय माज्या गरीबाच्या घरात !

**बाजीराव** :—जानोबा, तुमचा गोड स्वभाव आणि सोनूताईचा प्रामाणिकपणा हेंच आम्हांला अमृत वाटतं ! अहो, या जगांत दुसरं काय मिळवायचं आहे ! एकमेकांच ेम ! हो, काय बरं सांगत होतो मी तुम्हांला ? हो, हेंच तें. मच्या घरीं सुशीलेला मी आणून ठेवली आहे हें कुणालाहि माहित नसल्यामुळं

आमच्या अण्णानां मी एक लोणकढी थाप ठोकली आहे. आणि त्यांना ती अगदीं खरी वाटली आहे. आणि संभाजीसुद्धां ती हकीगत कळल्यापासून अगदीं वेडा झाला आहे. '

**जानू** :—मजे ? असं सांगतलॅाव तरी काय ?

**बाजीराव** :—अण्णांना सांगीतलं, संभाजीचं आणि ताईचं लग्न तुम्हीं जुळूं दिलं नाहींत आणि नाना प्रकारें तिचा छळ केलात म्हणून तिनं आत्महत्त्या करायचं ठरवलं आहे. आणि त्याच हेतूनं ती कुठंतरी दूर निघून गेली !

**जानू** :—काय म्हनतांव हे भाऊ ? खरंकीं काय हें ?

**बाजीराव** :—अगदीं खरंच सांगीतलं असं. आतां थोड्याच दिवसांत सुशीलेच्या आत्महत्तेची वार्ता येईल आणि पोलीसांची पार्टी घराला वेढा देईल ! अण्णाना हें सांगितल्यापासून ते तर अगदीं गर्भगळीतच झाले आहेत.

**जानू** :—बेस ! लय चांगल केलांव हें !

**बाजीराव** :— मात्र हें तुम्हीं ताईला कळवूं नका हं ? यातलं तिला कांहीं एक माहीत नाहीं. ही बातमी अगदीं शेवटपर्यंत गुप्त राहीली पाहिजे. आतांपर्यंत ताईला गुप्त तऱ्हेनं जशी आपल्या घरीं ठेवलीत तशीच आणखी कांहीं दिवस ही बातमी गुप्त ठेवण्यांबद्दल सोनूताईला बजावून सांगा. संभाजीलासुद्धां कळता कामा नये हं ?

**जानू** :—संभाजीदादा म्हणजे देवमानूस भाऊ ! माझ्या बावांन माज पाटीवरनं त्या, त्या—खेडीतंना उचलून आनलांन आंदारातन. अगदीं मरतानां वाचवलान माज ! अवो एवढ्या मोठ्या घनसान खालल्ाना होता माज ? माजे मावशीच्या चुलत्यास असाच खाल्लान होता म्हनतात. पर तो घनसान न्हवं हो ! अवो, गम्मत सांगतात, एका मोठ्या बारा हात लांब जनावरानं ' आर ' का काय म्हनतात त्यास. रानांत झाडास यटोळं घालून व्हता म्हनतात मेकऱ्याची वाट बगीत. पर त्या मेकऱ्याचं नशिब ताट, नि पडली आमच्या ह्या काकल्याची गाट ! मग काय इचारताव, लागलीच त्याची वाट ! त्या भयंकार जनावरांन मारलांन शेपटाचा फटका नि केलानं आडवा आमच्या काकल्यास ! आनि राव, फुढं काय इचारतांव, लाकडांची भारी बांदतात नां ? तसी त्याच्या दोन पायांची केलान जूडी आनि गिळाया सुरवात केलानं त्या आरानं ! अॅ—ह्यॅ ! ! मग फुढं काय ? ह्या बाबाच्या काळजाचं पानी पानी झालं म्हणतात ! पर मानूस लय

धीराचा ! त्याचे कबंरस होतं. धार काडलेलं बोडसं, तं घेतलान हातात नि धाव घातलानं त्या आराच्या जबड्यांत ! चार चार चार चार ! चिरत न्हेलांन पोटगळी पावत ! झाला गार ? अगदीं थंडगार झाला तो आर ! ! काय पराकरम् ! काय पराकरम् ! ! जुनी मानसं ही राव !

**बाजीराव** :—फार शूर माणूस ! अशी माणसं पाहिजेत. नाहींतर जिवाणूं दिसल्याबरोबर लांबूनच जीव घेऊन पळणारीच माणसं फार ! बऱ्याच दिवसांनीं तुमची जुनी आठवण ऐकली आज. बराय आतां सुशीलेची भेट घेऊन मला लौकर गेलं पाहिजे परत. चला तर—

**जानू** :—( पाहून ) त्या बगा, तायसायबच इकडं येतायत.

**सुशीला** :—( येते ) भाऊ, किती वेळ झाला, मी जानूबाबांच्या खळ्यांतून पहात होतें, तुम्हीं आपले इथंच उभे राहीलांत ! तिकडं येण्याचं कांहीं तुमचं लक्षण दिसेना, तेव्हां म्हटलं तुमचं एवढं काय खलबत चाललंय तें पहावं तरी !

**बाजीराव** :—ताई, अग आम्ही आतां तिकडंच यायला निघालों होतो. खरं कीं नाहीं जानोबा ?

**सुशीला** :—पण इतका वेळ एवढं काय बोलणं चाललं होतं इथं ?

**बाजीराव** :—संभाजीची बिचाऱ्याची तब्येत ठीक नाहीं, त्याच्याबद्दल बोलत होतों !

**सुशीला** :—काय होतंय त्यांना ? भाऊ—

**बाजीराव** :—मधूनमधून वेडाच्या लहरी येत असतात. सुशीला, सुशीला ! असं तोंडानं बडबडत असतो म्हणतात !

**सुशीला** :—भाऊ, खरं कारे सांगतोस हें ?

**जानू** :—अवो, तायसाब—

**बाजीराव** :—तुम्हाला नाहीं ठाऊक जानोबा. अग ताई, आतां खोटं सांगायची मला काय बरं जरूर ?

**सुशीला** :—भाऊ ! मग तूं त्याना इकडं घेऊन ये पाहूं ? नाहींतर मी तरी तिकडं येते !

**बाजीराव :**—पैठणी नेसून ये ? म्हणे येते ! हालायचं नाहीं जानोबांच्या झोपडींतून. अशी फिरतांना तुला जर कोणी पाहिली तर माझी पुरी फजीती होईल ! जानोबांच्या मुलांना खेळवीत बैस त्यांच्या घरीं ! समजलं ?

**सुशीला :**—भाऊ, पण तुझा विचार तरी काय आहे ? तूं सुद्धां मला अशीच छळणार आहेस कारे ?

**बाजीराव :**—अगदीं पुरेपूर ! ढळढळा रडेपर्यंत ! शेवटीं पाया पडायला सुद्धां लावणार आहे.

**सुशीला :**—एक वेळां सोडून हवी तर सात वेळां पाया पडते तुझ्या. पण मला या चिंतेतून सोडव !

**बाजीराव :**—म्हणजे जानोबांच्या घरीं तुला आणून ठेवली ती काय चिंता करण्यासाठीं ?

**जानू :**—हे मातर खरं हं ? तायसाब सारक्या इचार करीत असतात. मी माज्या आटवानी सांगायस गेलों तर यांच ध्यानंच नसतं माज्या बोलन्याकडं ! सारकं आपलं हं: हं, हं, हं ! करीत असतात !

**सुशीला :**—जानूबाबा, मेलं माझं चित्तच ठिकाणीं नाहीं हो ! या भाऊनं अशी मला झुरून मरायला कशाला जिवंत ठेवली आहे कुणाला ठाऊक ! त्या दिवशींच नदींत उडी टाकून प्राण देत होतें, पण यानं सगळा घोटाळा केला ! खोटी आशा लावून यानं मला फुकट जगवलंय !

**जानू :**—तायसाब, बाजीरावभाऊ आज साऱ्या गावांचं लाडकं हायत बरं ! त म्हनतील ती पुरव हाय आतां ! गरीबांच देव हायेत ते ! त्यांच्यावर पूरा इस्वास ठेवा. सारं बेस व्हयल !

**बाजीराव :**—जानोबा, बराच वेळ झाला. जातो मी आतां. ताई काळजी करूं नकोस हं तूं ! (जातो.)

**सुशीला :**—काळजी करूं नको तर काय करूं ? जिवाला सारखी हुरहुर लागली आहे ! त्यांच्या जिवाला बरेपण नाहीं ! त्यांच मन माझ्यासाठीं वेडं झालं आहे ! जानूबाबा, हृदयाच्या यातना हृदयालाच कळतात हो ! काय बरं म्हणाला भाऊ ? ते सुशीला-सुशीला—असं बडबडत असतात ? सुशीला—सुशीला असं म्हणत असतात ! ! (तल्लीन होते.)

**जानू** :—तायसाब, ती—बगा, आपली शेरडं आली. चला—

**सुशीला** :—आपल्या पाडसांना पाजायला शेळ्या आल्या! गाई वासरांना हंबरत आल्या! पाखरं आपआपल्या घरट्यांत गेली! रविराया प्रीतीरसानं लाल-लाल होऊन आपल्या लाडकेला भेटायला चालला! सारे प्राणिमात्र, सारी सृष्टी आपल्या प्रेमी जीवांच्या सहवासांत आनंद लुटायला चालली आणि मी?—मी—मी—

मी अभागी एकटीच उभी रानींवनीं या बाला!
संध्याछाया पसरल्या या दिशा लाल झाल्या॥
राघू मैना घरट्या गेली किलबिल सगळी बंद झाली।
आली गुरे गाई आल्या हंबरती त्या वासराला।
हरणी फिरल्या परतूनी वना
पाखराया पाडसाना!
रविराया तो अस्ता गेला,
मंगल प्रभात उजडायाला!
संसारी या माझा सखया,
भेटेल कधीं तो न कळे मजला!!
हुरहुर अति ही मम हृदयाला,
जाळसी देवा कां जीवाला!!

[ पडदा ]

★

## प्रवेश २ रा

[स्थळ :—हणमंतरावांचें घर. बाजीराव, हणमंतराव व यमुना बोलत असतात.]

**हणमंत** :—बाजीराव, तूं सांगतोस ह्या हकिगतीवर माझा कांहीं विश्वास बसत नाहीं.

**बाजीराव** :—मग त्याला माझा नाइलाज आहे.

**हणमंत** :—बाजीराव, कांहीं कर पण सुशीलेला परत घेऊन ये.

**यमुना** :—बरं का भाऊजी, आम्हांला वन्सं कांहीं जड झाल्या नाहींत. त्यांना आपल्या परत घेऊन या तुम्हीं.

**हणमंत** :—या पुढं तिच्याच इच्छेप्रमाणं करूं सगळं. मग तर झालं ?

**बाजीराव** :—पण आतां तुमच्या या इच्छेचा काय उपयोग ? ती बिचारी कधीच मरूनहि गेली असेल ! आज इतके दिवस झाले तिचा पत्ता नाहीं ! जिवंत असतांना तुम्हीं तिच्या विनंतीकडं कधीं ढुंकूनहि पाहिलं नाहींत ! तिचा तुम्हीं अनिवार छळ केलात ! आणि आतां तिच्याबद्दल सहानुभूति दाखवतांना कांहीं वाटलं पाहिजे तुम्हांला !

**हणमंत** :—आमचं चुकलं म्हणून आम्हीं आतां कबूल करतोयना ?

**बाजीराव** :—आतां कबूल करून त्याचा काय उपयोग ?

**हणमंत** :—तेंहि खरंच ! आतां फक्त दोषाचाच मालक मी ! सारा गांव माझ्या नांवानं टाहो फोडतोय ! बहिणीचा प्राण घ्यायला कारण मी झालो म्हणून राजरोस माझ्या नांवाची बदनामी चालली आहे ! अस्पृश्यता नष्ट होऊ नये म्हणून दुराग्रह धरला नि पुरा पस्तावालों ! सारा गांव एक झाला आणि मी एकटाच एकलकोंड्याप्रमाणं एका बाजूला राहीलों ! माझ्याच करणीनं माझी ही अशी फजिती झाली !

**यमुना** :—आतां गावांतून वर मान करून चालायची सुद्धां मेली लाज झाली !

**बाजीराव** :—माणसानं स्वतः होऊन स्वतःची नापत करून घेतल्यावर त्याला दुसरा कोण काय करणार ! काळाची पावलं ओळखून चालण्यातच माणसाचं हित असतं.

**हणमंत** :—एकंदरींत झाला तो आमच्या हातून मूर्खपणाच झाला म्हणायचा ! आमचं म्हणणं कितीहि जरी खरं असलं तरी शेवटी 'बळी तो कान पिळी' हेंच तत्व खरं ! एका हातानं टाळी थोडीच वाजणार ! सहस्र नगाऱ्यांपुढं एकुलत्या एका टिमकीचा आवाज काय प्रभाव पाडणार ! ठीक आहे, झालं तें होऊन गेलं ! तुझ्या मनाप्रमाणं तरी झालं ना सर्व ? ठीक झालं ! तुम्हीं पुढं व्हा आणि करा काय तो पराक्रम ! आम्हीं आपले मागं रहातो. महाराना पुढं घ्या, नाहींतर मांगाना जवळ बसवा, आमचं कांहीं जात नाहीं. माझी सुशीला तेवढी एकदां परत आली असती म्हणजे जिवाला शांती मिळाली असती.

**यमुना** :—वन्सं गेल्यापासून अन्नसुद्धा [redacted] आम्हाला.

**बाजीराव** :—वहिनी, तुझी माया होतीच तशी नणंद्रेवर !

**यमुना** :—मग खोटं आहे कीं काय ?

**बाजीराव** :—छे छे ! अगदीं खरं ! खोटं म्हणायची कुणाची बिशाद आहे ?

**हणमंत** :—अरे तिच्यावर आमची किती माया होती हें आतां तुला सांगून काय उपयोग ?

**बाजीराव** :—हें मला ठाऊक का नाहीं अण्णा ? सुशीलेवर तुमची माया किती होती हें मलाच काय पण साऱ्या गावाला ठाऊक आहे.

**हणमंत** :—असं थट्टेवारी नेऊं नकोस बाजीराव !

**बाजीराव** :—आतां काय सांगावं ! मनापासून बोललों तरीसुद्धां तुम्हांला थट्टाच वाटते ? आतां तुमच्याच बोलण्यावर जर तुमचा विश्वास नाहीं तर त्याला मी तरी काय करूं ?

**यमुना** :—आमच्या वन्सं किती प्रेमळ ! किती मायाळू ! उभ्या जन्मांत कधीं ' मेलीस ' असं म्हटलं नाहीं माझ्या नणंदेनं मला !

**बाजीराव** :—मेली म्हैस मणभर दुधाची ! असं म्हणतात तें काहीं खोटं नाहीं.

**यमुना** :—मी हें पाठीमागचं बोलतें असं नव्हे तर वन्सं इथं असतांनासुद्धां मी त्यांची सारखी स्तुती करीत असे. यांना विचारा हवं तर ?

**बाजीराव** :—बायकोला नवरा साक्षी ! पुरावा मजबूत झाला यांत तिळमात्र शंका नाहीं !

**हणमंत** :—अरे आमची सुशीला आम्हांला नको का होती ?

**बाजीराव** :—छे छे ! असं कोण म्हणेल ?

**हणमंत** :—हें पहा, सुशीलेनं आत्महत्या केली असं तूं म्हणतोस, पण या तुझ्या म्हणण्याला काय पुरावा आहे ?

**बाजीराव** :—स्वतःच्या आशाआकांक्षांची राखरांगोळी झालेली पाहून, प्रयत्नांची पराकाष्ठा करूनहि, स्वतःच्या इच्छा विफल करणाऱ्या वडीलमाणसांच्या जुलमांना कंटाळून गेलेली एखादी अनाथ पोर, आत्महत्येशिवाय दुसरा कोणता मार्ग पत्करणार ? जिला उभ्या आयुष्यांत एक रात्रहि दुसऱ्याच्या घरीं रहायचं ठाऊक

नाहीं, ती एकटी पोर, आज कितीतरी दिवस झाले बेपत्ता आहे, मग ती दुसऱ्या कुठं जाणार ? तुमच्या जुलमांना कंटाळून तिनं आत्महत्याच केली असेल ! बिचार संभाजी तिच्यामुळं वेडा झाला आहे ! साबाजीरावांची स्थिति अगदीं शोचनीया झाली आहे ! अण्णा, सुशीलेच्या नि संभाजीच्या निस्सीम प्रेमाची तुम्हीं होळी पेटवलींत ! त्यांना देशोधडीला लावलंत !

**हणमंत** :—आता जर माझ्यासमोर सुशीला असती, तर कोणत्याहि प्रकारचा विरोध न करतां संभाजीबरोबर मी तिचं लग्न लावून टाकलं असतं !

**बाजीराव** :—पण आतां बोलण्याचा काय उपयोग ?

**यमुना** :—खरंच, वन्संचा नि त्यांचा जोडा कसा अगदीं लक्ष्मीनारायणा-सारखा शोभला असता !

**बाजीराव** :—शाबास ! वारा वाहिल तशी पाठ फिरवण्याची युक्ति ज्यांना हवी असेल त्यांनीं ती आमच्या वहिनीपासून शिकावी.

**हणमंत** :—खरंच बाजीराव, तूं सुशीलेला कुठूनही शोधून घेऊन ये. देवा-शपथ सांगतो संभाजीबरोबरच तिचं लग्न अगदीं थाटांत करून टाकतो. आणि आज मी साबाजीरावानां निरोपसुद्धां दिला आहे. म्हटलं झाल्या गोष्टी विसरून जा, आणि एकदां आमच्या भेटीस या.

**यमुना** :—भावोजीना कांहींतरी नक्की माहीत असेल वन्संच्या बद्दल.

**बाजीराव** :—मला ? घ्या ! म्हणजे तुमच्याबरोबर मलासुद्धां गोवतां कीं काय या भानगडींत ! आपल्याला सुशीलेबद्दल एवढंच माहीत आहे, कीं तुम्हीं नवराबायकोनी तिला भयंकर छळलंत म्हणून ती घर सोडून गेली. आतां ती कुठं गेली आणि काय झालं हें तुम्हांला किंवा त्या देवाला माहीत ! इतके दिवस झाले तिचा कुठंच पत्ता नाहीं, त्या अर्थी तिनं विकाराच्या भरांत आत्महत्त्या केली असावी असा माझा तर्क आहे. ठीक आहे ! उगीच जास्त बोललों तर तुम्हाला आणखी राग येईल ! तेव्हां मी आपला इथून दूर होतों. ( जातो. )

**हणमंत** :—सुशीलेच्या शोधासाठीं इतक्या लोकांना पाठवलं, मी स्वतः जातीनं जिकडंतिकडं तपास केला पण त्या पोरीचा कांहीं कुठं थांगपत्ता लागला नाहीं ! खरोखरच तिनं आत्महत्त्या केली असावी ! आतां काय करावं ! आणि ही गोष्ट जर खरी ठरली तर ? स्वर्गातील आईबाबांचा आत्मा काय म्हणेल ?

मला कृतघ्न ठरवून ते मला शाप देतील! काय करावं! मस्तक कसं भडकूं लागलं आहे! चारी बाजूनीं सर्व गोष्टी माझ्याच आंगलट येऊ लागल्या आहेत!

**यमुना** :—खरंच बाई! आताशा मेलं जिकडं तिकडं लोक आम्हांलाच वाईट म्हणतात!

**हणमंत** :—झालं तें झालं! आतां यापुढं लोकमताप्रमाणंच वागून आपली गेलेली पत आपल्याला परत मिळवली पाहिजे. अखेरीस बाजीरावचंच तत्व खरं झालं! लोकमताच्याविरुद्ध जाऊन सध्यांच्या जगांत निभाव लागायचा नाहीं. ( साबाजीराव येतात. ) या, या साबाजीराव, या! असे पुढं या. अहो उभे काय असे? बसा, बसा! बसा ना!

**साबाजी** :—( बसतो ) हणमंतराव, आपण निरोप दिला होतात मला?

**हणमंत** :—होय, साबाजीराव, निरोप म्हणजे-अगदीं मुद्दाम निरोप पाठवला तुम्हांला.

**साबाजी** :—कां बरं, आम्हां गरीबावर एवढी मेहरबानी झाली?

**हणमंत** :—साबाजीराव, झालंगेलं विसरून जा, आणि क्षमा करा. हें सांगण्यासाठीं आज मी तुम्हांला मुद्दाम बोलावलं.

**साबाजी** :—आम्हीं लाचार आपणासारख्या थोरांना क्षमा कसली करणार हणमंतराव! आपण आज गावांत कर्ते आहांत!

**हणमंत** :—छे छे! साबाजीराव, आतां तुम्हीं सुद्धां नका बुवा असं टोचून बोलूं! ( यमुनेस ) अग साबाजीरावांना चहा तरी घेऊन ये. ( यमुना आंत जाते )

**साबाजी** :—छे छे! चहा कशाला! मी चहा पीतच नाहीं!

**हणमंत** :—साबाजीराव, तुमचं आमचं पूर्वीचं केवढं घरोब्याचं नातं?

**साबाजी** :—आतां त्या जुन्या आठवणी कशाला काढतां हणमंतराव?

**हणमंत** :—तेव्हां मी आतां असं ठरवलंय, झालं गेलं सर्व विसरून जायचं आणि पूर्ववत् आपले ऋणानुबंध जोंडायचे.

**साबाजी** :—हणमंतराव, आपणच बोलतां का हें? माझ्या संभाजीच्या आयुष्याची माती झाली हो हणमंतराव! तुमच्या कठोर कृतीनं तुम्हीं केलेल्या त्या राजरोस अपमानानं माझा भाऊ आणि मी जिवंत जळून खाक झालों हो! आतां

जे राहिलों आहोंत ते फक्त जळक्या शरीराची प्रेतें ! जळके सांगाडे ! हणमंतराव कसं बोलूं ? तुमच्च्या बहिणीसाठीं माझ्या संभाजीनं आपलं जीवित मातीमोल केलं ! आणि आतां ऐकतों ती सुद्धां बिचारी-आतां माझ्या भावाला जगायला जगांत आधारच राहीला नाहीं !

**हणमंत** :—साबाजीराव, माझी सुशीला कुठं नापत्ता झाली आहे ! तिच्या-बद्दलचा कांहीं थांगपत्ता तुम्हांला लागला कां ? ती परत घरीं येईल म्हणून आज इतके दिवस एखाद्या चातकाप्रमाणं वाट पाहात बसलों आहे !

**साबाजी** :—ती बिचारी आतां कुठून परत येणार ! जीवाला कंटाळून तिनं आत्महत्त्या केली असं ऐकलं मी !

**हणमंत** :—साबाजीराव, खरंच माझ्या सुशीलेनं आत्महत्या केली असेल का हो ? तुम्हांला खरं वाटतं काहो हें ?

**साबाजी** :—कां खरं वाटणार नाहीं ? हणमंतराव, इच्छेच्या तृप्तीसाठीं माणूस बऱ्यावाईट कोणत्याहि कृतीचा अवलंब करतो ! निस्सीम प्रेमापुढं सारं जग तुच्छ समजणाऱ्या व्यक्ति जगांत कितीतरी होऊन गेल्या ! बहुगुणी व्यक्तिच्या भावना पायदळीं तुडवून, स्वतःच्या मोठेपणासाठीं तुमच्यासारख्या असंख्य लोकांनीं या जगांत गुणी जिवांना आत्महत्येसारखा मार्ग दाखवून, समाजाची भयंकर हानी केली आहे ! जातीयतेचा खोटा अहंकार बाळगून, स्वतःच्या अडाणीपणाचं प्रदर्शन जगाला दिसत असतांनासुद्धां, स्वतःला मोठे-पणाच्या उत्पत्तीचे जनक समजून बहुगुणी जीवांना तुच्छ लेखून, परिणामीं शक्तीच्या जोरावर त्यांना नामशेष करून राष्ट्राचं भयंकर नुकसान केलं आहे ! हणमंतराव, काय सांगू तुम्हांला ! आज माझा संसार मातीमोल करायला कारण तुम्हीं अहांत ! माझ्या भावाला वेडा बनवायला कारण तुम्हीं झालांत ! माझ्या आशा आकांक्षांना मूठमाती द्यायला कारण तुम्हीं ! इतकंच नव्हे—तर माझा—माझा सर्वस्वी नाश करायला कारण तुम्हीं ! तुम्हीं दुष्ट अहांत ! वाईट-वाईट-अहांत ! स्वार्थी—अभिमानी-चांडाळ ! ! ( भानावर येऊन ) अरेरे ! काय बोललों मी हें ! क्षमा करा ! हणमंतराव, हात जोडतों तुम्हांला ! मनाचा तोल सुटला, शरीराचा भडाग्नी झाला ! स्वतःच्या जीभेवर माझा ताबा राहीला नाहीं ! म्हणून असा प्रसंग घडला ! रागावूं नका हणमंतराव ! आतां मी काय करूं तें तुम्हींच सांगा ! माझ्या जीवाची धनीण मला सोडून गेली—काळाच्या जबडयांत पडली

एकापेक्षां एक अशी माझी रत्नासारखी मुलं कठोर काळानं हिरावून नेली ! त्या दिवसापासून, तें भयंकर दुःख विसरून कुणाच्या तोंडाकडं.पाहून जगलों आज-पर्यंत ? माझ्या भावाच्या ! माझ्या संभाजीच्या ! पण—त्या माझ्या जीवालासुद्धां कीड लागलेली पाहून माझ्या हृदयाचे शतशः तुकडे तुकडे झाले ! ! हणमंतराव, याला कारण कोण ? आमची जात—आमचा समाज—कीं आमची संस्कृति ? कोण याला कारण ?

**हणमंत** :—साबाजीराव, याला कारण—याला कारण मी आहे !

**साबाजी** :—छे छे ! हणमंतराव, असं मी नाहीं म्हणत ! तुम्हीं तरी काय करणार ! ईश्वराच्या मनांतच जर आमचा अंत पहायचा आहे तर त्याला तुम्हीं तरी काय करणार ? हणमंतराव, क्षमा करा ! तुम्हांला अधिकउणं बोललों—अपराधी आहे मी ! जातों मी आतां !

**हणमंत** :—साबाजीराव, जर यापुढं सुशीला माझ्या दृष्टीस पडली नाहीं तर—तर यापुढं सगळ्यांच्या उण्याअधिक बोलांचा मी धनीच आहे ! मग माझ्या नशिबी पश्चात्तापाशिवाय दुसरा कांहीं नाहीं ! मात्र माझ्या सुदैवानं माझी सुशीला जर मला पुन्हां दिसली तर—तर-आतांच काय सागूं तें—साबाजीराव, आजतरी मी सर्वस्वी अपराधीच आहे ! काय करूं ! या प्रसंगातून कसा मार्ग काढूं ?

**साबाजी** :—हणमंतराव, जातो मी आतां. घरीं लौकर गेलों नाहीं तर तो वेडाच्या लहरींत कुठंतरी निघून जाईल ! बरं आहे-जातों आधीं—( जातो )

[ साबजीराव जातात. हणमंतराव विचार करीत बसलेले असतात ]

**[ पडदा ]**

★

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ** :—गावाबाहेरील नदीचें तीर. वेळ संध्याकाळची. जानू व सोनी बोलत बोलत येतात. ]

**जानू** :—आतां माजं म्हननं पटायस लागलं ना तुला ? तवां अगदीं साऱ्या लोकास्नीं शिव्या देयत व्हतीस. मी बाजीरावभाऊंच्या कामास जाय तवां अगदीं दातव्हट खावन माजेवर वरडस नि आतां ?

**सोनी** :—व्हय बाय ! अवो, मेली बायकांची बुदी तोकडी ! आमी गांवरानीं बायका ! आमास इतका पोच हाय व्हंय ?

**जानू** :—आतां 'बामनांच्या नि मराठ्यांच्या मुलांमंदी आमची बी पोरं बसायला लागली नां मांडयेस मांडी देवून. पयल्या काळांत व्हतं व्हय असं ? सवराज झाल्याबराबर आमच पांग फिटलं ! आतां सुकाची मिटभाकर तरी मिळल्याय ! अग आतां लय बेस व्हनार हाय आम्हां गरीबांच !

**सोनी** :—खरचं ? असं काय व्हनार तरी काय बाय ?

**जानू** :—अगदींच कसीग यडी तूं ! जवा तवां मला मातर दमदाटि करतेस, पन तुला अगदींच गीन्यान नाय !

**सोनी** :—बरं नसूंदे ! पर काय होनार तरी काय तें सांगा ?

**जानू** :—अग आतां काय काय म्हनू सागूं तुला ? आमची पोरं शिकनार ! बामनांमराठ्यावानीं मोठ्यामोठ्या सरकारी कामांत जानार ! लय लय मान त्यास्नी मिळनार ! आमाला आतां म्हार म्हणू कोनी लांब नाय सारनार ! आमचं आतां अगदीं पूरं पांग फिटलं ! आतां आमां गरीबांचं दिस लयलय चुकोट येनार बग !

**सोनी** :—खरंच ?

**जानू** :—अग खरंच मजे काय ? अगदीं खरं ! आपुनसुद्धां चांगल वागायस हवं हो ? बाजीरावभाऊ काय सांगतात रोज ? आयकस नाय तूं ?

**सोनी** :—खरंच बाजीरावदादा आमां गरीबाच वालीच हायत ! अगे बाय ! किती वो यळ झाला ? घरांत पावनी हाय सुसीलाताई तिची आटवान हाय तुमांस ?

**जानू** :— सोने, ती एक लय मोटी जबावदारी हाय वो आमचेवर हिकडची बात तिकड होता कामा नये. बाजीरावभाऊंचं उपकार फेडायची हिच खरी येल हाय. चल बगूं—

[ ती दोघ एका बाजूनें जातात. दुसऱ्या बाजूनें संभाजी चिंतातूर स्थितींत स्वतःशींच बडबडत येतो. त्याचा पोशाख गबाळ्या सारखा असतो. ]

**संभाजी** :—प्रेम कीं कर्तव्य या विचारांच्या झगड्यांत झगडतां झगडतां माझा मनस्ताप इतका भयंकर वाढला आहे कीं, मेंदूला कढ येऊन टाळूवर वाफेच्या कशा लाटा येत आहेत ! स्मरणशक्तिचें इंद्रिय बधीर झाल्यामुळें,

वेड्यांत नि माझ्यांत सूतरामहि फरक राहिलेला नाहीं ! शहाणपणाचा अंश शिल्लक आहे म्हणून त्या समोर वहात असलेल्या नदींत उडी घेऊं कीं, वेडे-पणाच्या लहरीत कर्तव्यासाठीं जगूं ? प्रेम कीं कर्तव्य ? कर्तव्य कीं प्रेम ? प्रेम कीं कर्तव्य ? आग लागूं दे त्या कर्तव्याला ! जिनं माझ्यासाठीं आपलं प्रेम पणाला लावून जीवाचं बलिदान केलं, त्या माझ्या सुशीलेसाठीं, तिच्या निस्सीम प्रेमासाठीं मलाहि तिच्या पाठोपाठ स्वर्गाच्या वाटेला लागलंच पाहिजे. तिथं गेल्यावर तरी आमचे मनोरथ पूर्ण होतील ! पण–तिथं तरी आमचं इच्छित ध्येय पुरं होईल ना ? कीं, या भूलोकाप्रमाणं स्वर्गलोकांतसुद्धां जातीयवादाचा धुमाकुळ माजलेला असेल ? छे छे ! ! असं कसं असेल ! देवाच्या दरबारांत उच्च नीच भेदभाव खास नसेल ! बस्स ठरलं ! या गंगेच्या प्रवाहात जलसमाधी घेऊन पवित्र मार्गानं स्वर्गाचा रस्ता धरायचा ! जोरानं चालायचा विचार केला तर पायच उचलत नाहीं ! डोळ्यांची बुबुळें विस्फारून–विस्फारून पहातोय पण मला समोरचा मार्गच दिसत नाहीं ! एका हांकेच्या अंतरावर असलेल्या डोहापर्यंत जाऊन पोहचण्याचं त्राण माझ्या अंगांत नाहीं ! कर्तव्य कर्तव्य म्हणून कानांच्या छिद्राजवळ साद आदळत आहेत ! वेडेपणा करू नकोस म्हणून कोणीतरी वेडयासारखंच बडबडत आहे ! ( आठवण झाल्यासारखे करून ) दादा ! दादा, मी तुमच्यासाठीं जगूं ? होय ! तुमच्यासाठीं जगणं हें माझं कर्तव्य आहे ! तुम्हांला माझ्यावाचून दुसरं कोणी नाहीं हें सुद्धां मला दिसत आहे ! पण पण–माझ्या सुशीलेशीं मी कशी हो प्रतारणा करूं ! तिला कशी फसवूं ! तिला दिलेलं वचन जर मी पाळलं नाहीं तर माझ्यासारखा बेइमान मीच ! हें तुम्हांला आवडेल का ? नाहीं, माझ्या दादांना अशा तऱ्हेची बेइमानी कधींहि आवडणार नाहीं ! दादा, मला क्षमा करा ! हा तुमचा भाऊ तुमच्या सेवेला पात्र नाहीं असं समजा नि त्याची आशा सोडा ! बस्स ! कार्याच्या दिशेनं पाऊल टाकलंच पाहिजे. ( थोडंसं चालून गेल्यावर त्याला समोरून धावत येणारी एक व्यक्ति अस्पष्ट दिसते तिच्याकडे पाहून– ) अरे ! समोरून कोण पळत येत आहे ? स्त्री आहे कोणी तरी ! या तिन्हींसांजच्या वेळीं या एकांत वाटेनं पळत येणारी ही आकृति माणसाची आहे कीं भूताची ? म्हणजे ? अशा तऱ्हेनं माझ्या मार्गात विघ्न आणायची काळाची तयारी आहे काय ? बस्स ! कोणत्याहि प्रसंगाला न जुमानतां मला माझा ध्येयमार्ग गांठलाच पाहिजे. [ तो जोरानें चालूं लागतो. इतक्यांत समोरून घाबऱ्याघाबऱ्यानें सुशीला धावत येते. संभाजीला समोर पहातांच ती आश्चर्यानें थक्क होते ]

**सुशीला** :—कोण ? आपण !

**संभाजी** :—कोण ? माझी सुशीला ! म्हणजे खरंच मी वेडा झालों कीं काय ? मी स्वप्नांत तर नाहीं ना ? सुशीला, तूं खरोखर माझी सुशीलाच आहेस का ? सुशीला—सुशीला—

**सुशीला** :—माझ्या राया ! ही तुझीच सुशीला बरं ! तुझीच—( भेटते. )

**संभाजी** :—अहाहा ! काय पहातों हें ? स्वप्नाच्या सुखांत कां होईना माणूस सुखी-सुखी-होतो हेंच खरं ! ( तल्लीन होतो. )

**सुशीला** :—( त्याला हलवीत ) अहो, अहो-डोळे काय झांकतां ? पहा ना माझ्याकडं ?

**संभाजी** :—( भानावर येऊन ) हो ! खरंच ! ! माझी सुशीलाच ! काळानं हिरावून नेलेली माझी सुशीला जीवंत कशी झाली ?

**सुशीला** :—काय म्हणतां काय तुम्हीं ? कुणाला काळानं हिरावून नेलं ? प्रिया, आपलं चित्त ठिकाणीं आहे ना ?

**संभाजी** :—गेल्या क्षणापर्यंत ठिकाणीं नव्हतं. पण आतां या क्षणीं मात्र मी अगदीं पूर्ण शुद्धींत आलों आहे. सुशीला, एकंदरींत ती बातमी खोटी तर ?

**सुशीला** :—कसली बातमी ?

**संभाजी** :—छेः ! पुन्हा त्या शब्दाचा उच्चार सुद्धा नको !

**सुशीला** :—असली कसली बाई विचित्र बातमी ? मी आत्महत्त्या केली म्हणून कोणी सांगितलं कीं काय तुम्हाला ?

**संभाजी** :—होय.

**सुशीला** :—कुणी सांगितलं असं तुम्हांला ?

**संभाजी** :—तुझ्या भावानं ! बाजीराव म्हणाला सुशीलेनं आत्महत्त्या केली असेल !

**सुशीला** :—खऱ्याखोट्याची चौकशी न करतां तुम्हीं त्याच्या सागण्यावर विश्वास ठेवलात ?

**संभाजी** :—इतके दिवस झाले, तुझा कुठंच थांगपत्ता नाहीं, जिकडं तिकडं तुझ्या आत्महत्त्येची बातमी पसरलेली असतांना मी तिच्यावर विश्वास ठेऊं नको तर काय करूं ? पण तूं इथं कशी ? इतके दिवस होतीस कुठं ?

**सुशीला** :—त्या टेकडीवरल्या झोपडींत.

**संभाजी** :—जानोबाच्या घरीं ?

**सुशीला** :— हो ! कां, वाईट दिसलं तुम्हांला ?

**संभाजी** :—छे छे ! वाईट मुळींच नाहीं ! जानोबा जातीनं महार असले तरी मला ते माझ्या वडीलांप्रमाणंच पूज्य आहेत ! पण कायग, ही अजब युक्ति कोणाची ?

**सुशीला** :—दुसऱ्या कुणाची ? माझा भाऊराया आहे ना ?

**बाजीराव** :—( एकदम गडबडीनें येतो. ) अरे पळा-पळा-पळा ! अगोदर पळा—नाहींतर सगळाच होईल ब्रह्मघोटाळा ! इथंच सगळं नाटक संपेल !

**संभाजी** :—हा पाहिलास तुझा भाऊ ? बाजीराव, हें तूं आरंभलंयस तरी काय बुवा !

**बाजीराव** :—अरे ! अगोदर इथून पळा म्हणून सांगतों ना ? ये बाबा, तूं या आमच्या वहिणीला घेऊन त्या जानोबांच्या झोपडींत भूमिगत हो पाहूं अगोदर ! नाहींतर सगळाच स्फोट व्हायचा नि आमचा सारा डाव फसायचा !

**संभाजी** :—पण—बाजीराव—

**बाजीराव** :—तूं आता या वेळीं कांहीं विचारूं नकोस मला. ताई, चल—पळ—पळ—जा म्हणतो ना ? तोंडाकडं काय पहातां माझ्या ?

**संभाजी** :—बरं बुवा ! हीं पहा आम्ही निघालों. ( दोघेंही जातात. )

**जानू** :—( घाबऱ्या घाबऱ्या येतो. ) कोन भाऊ ? देवासारकं भेटलाव !

**बाजीराव** :—कां बरं ? जानूबाबा, असे घाबरलेले कां तुम्हीं ? कां ? काय झालं ?

**जानू** :—अवो, मी यज्यानं तायसायबासनीं सांगायचं तरी तसं ? पर म्हणतात नां, जित्यांची खोड मेल्यासिवाय जायत नाय्.

**बाजीराव** :—काय सांगितलंत तुम्हीं तिला !

**जानू** :—अवो, संबाजीदादा आतांसं भानावर नायत नां, तं मी त्यासनी समजावन सांगत व्हतो. पर, त्यानीं तं आयकल्याबराबर जा रस्ता धरला; त्या कुटं गेल्या देवास म्हायत ! आतां काय करूं ! त्या संबोरच्या वाकनांपावत दिसल्या मांज, पर, फुढं खय गेल्या त्याचा पत्ताच नाय. बेस झालं तुमी भेटलाव भाऊ !

नायत माजा जीव काय कुडीत ऱ्हायला नसता! अवो, माजेवर जबाबदारी ह्ायनां भाऊ!

**बाजीराव** :—हो हो तर. जबाबदारी आहेच तुमच्यावर. पण जानूबाबा, या गोष्टीची तुम्हीं चिंता करूं नका. सुशीला तुमच्याच झोपडींत असेल पहा जा.

**जानू** :--अवो, काय सांगतांव हे भावू! मी काय खोटं बोलतो व्हय?

**बाजीराव** :--अहो, पण मी सुद्धां खोटं बोलत नाहीं. जा पाहूं तुम्हीं घरीं. आणि पहा तुमच्या झोपडींत कोणकोण मंडळी आहे ती.

**जानू** :--मंडळी? ही वो, कोन मंडळी?

**बाजीराव** :—कान करा इकडं (कानांत सांगतो) समजलं आता? ठरलेल्या वेळीं या सगळी जणं हं? हं–जा–आतां तुहीं–जा—

**जानू** :—बाजीराव भाऊ, धन्य आसो तुमची! काय एक एक नाटक करतीव तें त्या देवासच ठावं! बरं जातो फुढं मी. (जातो.)

[ जानोबा गेल्यानंतर दुसऱ्या बाजूनें साबाजीराव घाबऱ्या घाबऱ्या--संभाजी, संभाजी–म्हणून हांका मारीत येतात. ]

**साबाजी** :—संभाजी—संभाजी—संभाजी—कोण? बाजीराव? बाजीराव, माझा संभाजी कुठं जीव द्यायला निघून गेला! बाजीराव, आतां कुठं शोधूं मी त्याला? बाजीराव—(रडकुंडीस येतो.)

**बाजीराव** :—थांबा, नाना असे घाबरूं नका. संभाजी सुखरूप आहे.

**साबाजी** :—काय? माझा संभू सुखरूप आहे? छे छे! बाजीराव, तूं मला खोटं तर सांगत नाहींस ना? मी तुमच्याकडं दुपारीं गेलों त्यावेळीं तो घरांत होता, पण तुमच्याकडून परत आल्यावर पाहिलं तर तो घरांत नाहीं! म्हटलं, गेला असेल कुठं तरी बाहेर पण–छे–माझ्या बैठकीच्या जाग्यावर ही पहा त्यानं ठेवलेली चिठी! वाच, बाजीराव वाच ही चिठी! माझा संभाजी असा कसा रे वेडा झाला! कुठं रे गेला! गेले कैक दिवस त्याचं मन ठिकाणी नाहीं. भ्रमिष्टासारखा वागतो, वेड्यासारखं कांहींतरीच करतो! आतां मी काय करूं या आपत्तीला! कुठं शोधूं माझ्या संभाजीला? आत्महत्त्या करायला जातो म्हणून त्यानं लिहिलं आहे! बाजीराव, बाजीराव या बाजूला तो कुठं दिसला का रे तुला?

**बाजीराव** :—होय—

**साबाजी** :—सांग ! कुठं आहे माझा संभाजी सांग ? सांग–बाजीराव सांग-खरंच दिसला कारे तुला ?

**बाजीराव** :—नाना माझ्या शब्दावर तुमचा विश्वास असला तर आतां तुम्हीं अगदीं निष्काळजी घरीं जा. थोडया वेळानं मी तिकडं येणार आहे तेव्हां अगदीं सगळी हकिगत समजावून सांगेन. संभाजी खुशाल आहे. त्याच्याबद्दल तिळमात्र घोर करूं नका. आतां जा पाहूं तुम्हीं घरीं.

**साबाजी** :—बाजीराव–पण–पण त्याला स्वतःच्या डोळ्यानीं पाहिल्याशिवाय माझ्या या वेडया जिवाची खात्री होत नाहीं रे ! बाजीराव, तो कुठं आहे तो सांग ! मला–नुसता–मला–एकदां दृष्टीनं पाहूं दे ! मी–हात जोडतों तुला ! बाजीराव—

**बाजीराव** :—नाना, काय हें ? माझ्या गळ्याची शपथ सांगतो तुम्हांला, संभाजी सुखरुप आहे ? आतां जा पाहूं तुम्हीं घरीं. थोडया वेळानं मी त्याला तिकडं घेऊन येतो.

**साबाजी** :—आतां तुझ्या आश्वासनानं माझ्या जीवांत जीव आला ! बाजीराव, पण लौकर घेऊन ये हं त्याला ! त्याला प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं ! लौकर घेऊन ये हं—

[ साबाजीराव पुन्हांपुन्हां सांगून जातात. ]

**बाजीराव** :—हो हो, हो ! अगदी लौकर घेऊन येतों. तुम्हीं अगदीं निष्काळजी रहा. एकंदरींत योग तर छान जुळून आला आहे. सुशीलेचा विरह अण्णाला आतांशा अगदीं असह्य झाला आहे. या सुसंधीचा फायदा घेऊन आपणाला आपला कार्यभाग साधलाच पाहिजे—

साधाया साधना योग भला ।
खचित मजला अजि हा दिसला ॥ धृ० ॥
कार्य कराया डाव मांडीला ।
सुदैवानें ‘ रमल ’ पडला ॥
पाहुनि कृतिला मोद मनाला ।
कंठीं माझ्या विजयमाला ॥ १ ॥

( जातो. )

## प्रवेश ४ था

[ **स्थळ** :—हणमंतरावांचें घर. हणमंतराव सारख्या येरझारा घालीत आहेत व मधून मधून यमुनाबाईवर संतप्त होत आहेत. यमुनाबाई अगदीं चिंतातूर स्थितींत बसलेल्या आहेत. ]

**हणमंत** :—मी एक मूर्ख होतों. पण तूं तरी शहाणपणा शिकवायला नको होतास मला ? नवऱ्याचं चुकत असलं तर त्याला नेहमीं पत्नीनं सांभाळायला हवं !

**यमुना** :—पुरे झालं ! आमचं ऐकतंय कोण खेटर ? जेव्हां तेव्हां सांगतां पायांतली वहाण पायांतच राहिली पाहिजे. मग, कुणी बोलावं बाई तुमच्या पुढं !

**हणमंत** :—अग पण माझं एक चुकलं ! पण तूं काय करीत होतीस ?

**यमुना** :—पुन्हां आपलं तेंच तुमचं ! मला उगीच कुणी दोष देऊ नका ! सारीजणं आपली मलाच दमदाटी करायला पहातात ! हा काय मेला त्रास न खातां न पिता ?

**हणमंत** :—जो जो विचार करावा तों तों मस्तक कसं भडकून जातं ! डोळ्याला डोळा लागत नाहीं. माणसाला पश्चात्तापासारखी दुसरी शिक्षा नाहीं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं ! काय करूं ! आतां नुसता पश्चात्ताप करून तरी काय उपयोग ? जगात नाचक्की व्हायची पाळी आली ! दुष्ट माणूस, निर्दय, कठोर, उलट्या काळजाचा म्हणून बायकापोरं वाटे गोवंडी बडबडूं लागली ! साऱ्या गांवची एकी झाली नि माझीच चूल निराळी पडली ! बाजीराव, काय करूं ? ( बाजीराव येतो ) आलास ? बाजीराव आतां मी काय करूं ? तूंच आतां मला मार्ग दाखव. लोक मला खूनी चांडाळ म्हणून संबोधतात रे !

**यमुना** :—असं मस्तक फिरल्यासारखं बडबडायला झालंय तरी काय ?

**हणमंत** :—चूप बस. मला उत्तर करतेस ? वाकडं बोलतेस ? जीभ छाटून टाकीन. बायको म्हणणार नाहीं. हिच्यामुळं माझ्या घराचा सत्यानाश झाला ! हिच्यामुळं माझी सुशीला गेली !

**यमुना** :—त्या देवाला डोळे आहेत ! माझ्यावर कुभांड रचलंत तरी तो पाहून घेईल एकएकाला !

**बाजीराव** :—वहिनी, अशी संतापू नकोस, अण्णा आतां झाल्या गोष्टीबद्दल एकमेकांना उणंअधिक बोलण्यांत काय अर्थ आहे ? खरं पाहिलं तर या

बाबतींत तुम्हीं दोघंही सारखीच दोषी अहांत. जाऊं द्या ! झालं तें होऊन गेलं ! आतां काय त्याचं !

**हणमंत** :—बाजीराव, माझी सुशीला अखेरीस गेलीच • ना रे ! कुठंच पत्ता लागत नाहीं का तिचा ?

**बाजीराव** :—छेः ! पुष्कळ शोधलं. पण कुठंच पत्ता नाहीं ! काय करावं ! बिचारी गेली आम्हांला सोडून !

**हणमंत** :—अरेरे ! मी अभाग्यानं काय केलं हें ? पाठच्या बहिणीचा छळ केला नि स्वतःच्या नांवाला काळीमा लावून घेतला !

**बाजीराव** :—हो ! अण्णा, तुम्हांला सांगायचं राहिलच. आज रात्रीं मला एक स्वप्न पडलं त्या स्वप्नांत मला असं दिसलं, सुशीला नि संभाजी आपल्याकडं जोड्यानं आली. आणि ती दोघ आपला आशिर्वाद मागत होती.

**हणमंत** :—खरच कीं काय ?

**बाजीराव** :—आणि काय बहारीची गोष्ट पहा अण्णा; तुम्हीं त्यांना मुक्तकंठानं आशिर्वादहि दिलांत !

**हणमंत** :—अरे दिलांत म्हणजे काय, जरूर दिला असता ! आतां या वेळीं तीं इथं यायला पाहिजे होतीं. त्या दोघांचं लग्नच लावून टाकलं असतं !

**बाजीराव** :—पण आतां काय करणार ! ती दोघंही कुठं गडप झाली देव जाणे ! अरे बाहेर कुणाची गडबड ? ( बाहेर पाहतो ) या, या, जानोबा या. कोण ? सुशीला–नि–संभाजी ? अण्णा--

**हणमंत** :—अरे काय म्हणतोस काय ?—

**बाजीराव** :—सुशीला आली—

**हणमंत** :—काय सुशीला आली ? ( आनंदाने नाचतो. )

**यमुना** :—काय वन्सं आल्या ? ( सुशीला, संभाजी व जानोबा येतात. )

**हणमंत** :—( गडबडीनें नाचत ) अग ये, मीठ मोहऱ्या तरी आण—

**यमुना** :—माझी बाळ कुठं होती ? ( हणमंतराव भेटतात. यमुनाबाई मीठ मोहऱ्या ओवाळून टाकतात. )

**बाजीराव** :—अण्णा—या दोघांनाही घरांतून हांकलून द्या !

**हणमंत** :—अरे तूं बोलूं नकोस आतां ! मी काय करतों तें पहा ! संभाजी, ये–असा जवळ ये. ( दोघांना आपल्या दोन्हीं बाजूस घेऊन उभे रहातात. इतक्यांत साबाजीराव येतात. )

**साबाजी** :—बाजीराव, अरे माझा संभाजी अजून आला नाहीं ? कुठं आहे माझा संभाजी ? ( संभाजी धावत जाऊन साबाजीरावांना भेटतो. )

**हणमंत** :—साबाजीराव, माझी बहिण सुशीला मी तुमच्या बंधुला-या संभाजीला दिली ! या, संभाजी, सुशीला, दोघंही अशी पुढं या. ( त्यांचे एकमेकांच्या हातांत हात देऊन ) साबाजीराव, ओगलेशास्त्रयांकडं जाऊन लग्नाला मुहूर्त पाहून या. जानोबा, तूं मंडळींना घेऊन मंडपाच्या तयारीला लाग आणि तूं रे बाजीराव ?

**बाजीराव** :—सहभोजनाचा समारंभ आहे आज आणि हरिजन मुलांना बक्षिसं वाटायचीं आहेत, ज्यांची मुलं अजून शाळेंत दाखल झालीं नाहींत त्यांची नांव नोंदवायची आहेत.

**हणमंत** :—बाकी बाजीराव आहेस खरा बावा तूं ? अगदीं झकास नाटक केलंस. बाबानीं पाळण्यांतच तुझे पाय ओळखले होते. ये बाजीराव, ऐकलंस का ? आजच्या तुमच्या सभेचं नि समारंभाचं अध्यक्षस्थान मी स्वीकारणार आहे. अग ये, माझा पोशाख काढ. साबाजीराव, या आतून जाऊया. जानोबा जा तूं आपल्या तयारीला लाग ना.

[ जानोबा बाहेर जातो. हणमंतराव, साबाजीराव व यमुना आंत जातात. ]

**बाजीराव** :—काय संभाजीराव ?

**संभाजी** :—काय बाजीराव ?

**बाजीराव** :—इतका ताठा आहे काय ?

**संभाजी** :—मेव्हण्याचा ताठा याहिपेक्षां वरचढ पाहिजे.

**बाजीराव** :—शेंडी धरून बाहेर घालवीन. मेहूणाबिहुणा ओळखणार नाहीं.

**संभाजी** :—शेंडी धरण्याऐवजीं कान धर. म्हणजे पुढं होणारा लग्नांतला सोहाळा आतांच होऊन जाईल.

**सुशीला** :—भाऊ, पण अण्णांचा हा बुद्धिभेद झाला तरी कसा ?

**बाजीराव** :—अग हा सगळा नाटकाचा परिणाम !

**सुशीला** :—भाऊ, आम्हीं उभयतां तुला शरण आहोंत !

**बाजीराव** :—नांदा सौख्य भरें जोंवरी नच—तथास्तु ! !

**॥ समाप्त ॥**

**अंक १ ला**—पृष्ठ २३, ओळ २२

**सोनी** :—मार्जं त्वांड दुकायस लागलं ही किट किट

( गाणें ) किती किटकिट करूं तरी बाय !
या वो संसाराचं तुमा ध्यान नाय ! ॥ धृ० ॥

**जानू** :— होऽऽऽग—हो ! कां उगी तुझी अशी घाय ;
माझ्या मनाला समदं ठावं हाय ! ॥ १ ॥

**सोनी** :— माझ्या जिवाची पेटतेय वो ल्हाय !
याची कदर वो तुमा कशी नाय ! ! ॥ २ ॥

**अंक २ रा**—प्र० २ रा, पृष्ठ ४१, ओळ २२

**यमुना** :—हा वेडाचा झटका अजून आहे का तुमच्या डोक्यांत ? आतां ईइ उपायच हरला !

( गाणें ) फुका धरुं नका हेका असा ।
छंद हा तुम्हां लागला कसा ? ॥ धृ० ॥

जन्म घेऊनियां थोर कुळीं ।
विसरलां कां नातीं सगळीं ।
आचरुनि अजि मार्गा अशा ।
कां लावितां उगा आम्हां दोषा ? ॥ १ ॥

**अंक ३ रा**—प्र० १ ला, पृष्ठ ६७, ओळ ७

**सोनी** :—आतां करूं तरी काय ह्या यडास ?

( गाणें ) पदर पसरते तुजे पायी इटलादेवी आई ।
धनी माजं खुळं याड ह्यं चुकतं हरघडी आई ॥ धृ० ॥

पावन हो गे नवसाला या ।
लेकरें माझी सुखी ठेवाया ।
नवस मानुन घे खुळीचा, मस्तक तुजीया पायी ॥ १ ॥

## ॥ नमन ॥

श्री हरि मजवरी कृपा करी ।
शामसुंदरा धांव झडकरी ॥ धृ० ॥

उदास बहुजन या संसारी ।
लवहि ना सुखा दुःख किती तरी !
मद माजला अति या भूवरीं ।
उसळती लाटा जणुं सागरी ।
त्यांतूनीं नेई मज पैल तीरी ॥ १ ॥